


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








१५२५

म.सा.पत्रिका १९८५-१९८६

अंक २३४, २३५, २३६, २३७

म. सा. पत्रिका

संपादक डॉ. वसंत स. जोशी

अंक 234 जुलै ते सप्टे. १९८५

अंक 235 ऑक्टो. ते डिसें. १९८५

अंक 236 जाने. ते मार्च १९८६

अंक 237 एप्रिल ते जून १९८६
(साहित्य संस्था विशेषांक)

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र साहित्य परिषद्



## पदाधिकारी आणि कार्यकारी मंडळ
## १९८५–८८



अध्यक्ष : श्री. शंकर पाटील

उपाध्यक्ष : प्रा. राम शेवाळकर,
प्रा. कृ. व. निकुम्ब,
डॉ. गंगाधर पानतावणे.

कार्याध्यक्ष : श्री. राजेन्द्र बनहट्टी.

कोषाध्यक्ष : श्री. म. श्री. दीक्षित.

कार्यवाह : श्री. राजा फडणीस,
डॉ. म. वि. गोखले,
श्री. प्रभाकर अत्रे.

पत्रिका संपादक : डॉ. वसंत स. जोशी.

सदस्य : डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रा. म. ना. अदवंत, सौ. ज्योत्स्ना देवधर, प्रा. गो. म. कुलकर्णी, — पुणे.
डॉ. लीला गोविलकर, अहमदनगर
प्रा. मंदाकिनी खांडेकर, कोल्हापूर
डॉ. वसंत सावंत, सावंतवाडी
श्री. देवकीनंदन सारस्वत, जळगांव
डॉ. द. ता. भोसले. मंचर



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३४ □ जुलै ते सप्टेंबर १९८५ □ मूल्य पाच रुपये

## अनुक्रम



□

:: संपादक ::

डॉ. वसंत स. जोशी

:: संपादन समिती ::

ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवन्त

:: सल्लागार ::

गो. म. कुलकर्णी, राजेन्द्र बनहट्टी

:: प्रकाशक व मुद्रक ::

डॉ. म. वि. गोखले

कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद टिळकरस्ता,

पुणे ४११ ०३० :: दूरध्वनी ४४२९६३

मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

□

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत.

अनुक्रमणिका








# संपादकीय

**म. सा. परिषदेची नवी कार्यकारिणी :**

म. सा. परिषदेच्या घटना दुरुस्तीप्रमाणे परिषदेचे वर्ष जुलै ते जून असे निश्चित झाल्यामुळे यावर्षीची परिषदेची त्रैवार्षिक निवडणूक जूनमध्ये घेण्यात आली. या निवडणुकीत निवडून आलेले सभासद व पदाधिकारी यांचे आम्ही मनःपूर्वक स्वागत करतो. या नव्या कार्यकारिणीतील प्रत्येक सभासद आपापल्या क्षेत्रात मोलाचे कार्य करीत आहे. प्रा. म. ना. अदवंत हे ज्येष्ठ समीक्षक, लघुनिबंधकार म्हणून ख्यातनाम आहेत. यापूर्वी बरीच वर्षे त्यांनी परिषदेचे कार्यवाह आणि उपाध्यक्ष म्हणून काम केले आहे. प्रा. गो. म. कुलकर्णी हे ज्येष्ठ समीक्षक आणि परिषदेच्या वाङ्मयेतिहासाच्या सहाव्या खंडाचे संपादक आहेत. कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी हे एक उत्तम कथाकार, प्रकाशक आणि कुशल प्रशासक आहेत. लेखक, कथाकार आणि कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध असलेले श्री. प्रभाकर अत्रे हे परिषदेच्या डोंबिवली शाखेचे कार्याध्यक्ष आहेत. सावंतवाडीचे मराठीचे प्राध्यापक, 'स्वस्तिक' आणि 'उगवाई' या काव्यसंग्रहाचे कर्ते डॉ. वसंत सावंत यांची बिनविरोध निवड झाली. परिषेदेचे माजी कार्यवाह डॉ. वसंत स. जोशी, श्री. अत्रे व श्री. बनहट्टी यांची बिनविरोध निवड झाली. पुण्याच्या विशाखा प्रकाशनचे श्री. राजा फडणीस यांनी यापूर्वीच्या कार्यकारिणीत कोषाध्यक्ष आणि महामंडळाचे सदस्य म्हणून कार्य केले आहे. फर्ग्युसन महाविद्यालयातील मराठी विभाग प्रमुख डॉ. गं. ना. जोगळेकर हे संशोधन समितीचे निमंत्रक होते. परिषदेच्या परीक्षा नव्याने सुरू करून त्या लोकप्रिय करण्यासाठी त्यांनी खूप परिश्रम घेतले. डॉ. जोशी व डॉ. जोगळेकर यांच्या संपादकत्वाने 'भाषा व साहित्य संशोधन खंड २ रा' हा ग्रंथ परिषदेने जूनमध्ये प्रसिद्ध केला. सुप्रसिद्ध कथाकार आणि कादंबरीकार सौ. ज्योत्स्ना देवधर यांनी यापूर्वीही कार्यकारिणीच्या सदस्य म्हणून काम केलेले आहे. पुण्याच्या वाडिया कॉलेजमधील मराठी विभाग प्रमुख डॉ. म. वि. गोखले यांनी अनेक महत्त्वाच्या ग्रंथांची साक्षेपी संपादने केली आहेत. बहुश्रुत वक्ते आणि लेखक म्हणून त्यांची प्रसिद्धी आहे. डॉ. लीला गोविलकर या नगर येथील सारडा महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख असून त्यांचे अनेक संशोधनपर ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. मराठी व्याकरणावर त्यांनी प्रबंध लेखन केले आहे. प्रा. मंदाकिनी खांडेकर या परिषदेच्या कोल्हापूर शाखेच्या कार्याध्यक्ष आहेत. तेथील महावीर महाविद्यालयात त्या मराठीच्या प्राध्यापिका म्हणून काम करतात. त्यांची अनेक संपादित पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. जळगावचे श्री. देवकीनंदन सारस्वत हे कवी आणि पत्रकार म्हणून प्रसिद्ध आहेत. आकाशवाणी आणि चित्रपट क्षेत्रातही त्यांनी काम केलेले आहे. श्री. म. श्री. दीक्षितांचा परिषदेच्या कार्याशी अनेक वर्षांचा घनिष्ट संबंध असून त्यांनी यापूर्वी कार्यवाह आणि महामंडळाचे सदस्य म्हणून काम केलेले आहे. मंचरच्या आवटे महाविद्यालयातील मराठी विभाग प्रमुख डॉ. द. ता. भोसले यापूर्वी परिषदेचे कार्यवाह होते. समीक्षक आणि ग्रामीण कथाकार म्हणून त्यांनी लौकिक संपादन केला आहे.

नांदेड येथे ऑक्टोबर १९८५ मध्ये भरणाऱ्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांची कार्यकारिणीने परिषदेचे अध्यक्ष म्हणून एकमताने निवड केली. उपाध्यक्षपदासाठी परिषदेच्या कार्यक्षेत्राबाहेरील प्रा. कृ. ब. निकुम्ब, प्राचार्य राम शेवाळकर आणि डॉ. गंगाधर पानतावणे यांची निवड करून महाराष्ट्राच्या सर्व विभागांशी परिषद निगडित केली आहे. नवे अध्यक्ष आणि उपाध्यक्ष यांच्या अनुभवाचा आणि कर्तृत्वाचा लाभ परिषदेला निश्चितच होईल.

या सर्वांचे आम्ही अंतःकरणपूर्वक स्वागत करतो.

परिषदेचे नवे पदाधिकारी आणि विविध समित्यांतील सभासद यांची माहिती याच अंकात अन्यत्र दिलेली आहे. या सर्व सदस्यांना त्यांच्या कार्यात परिषदेच्या सर्व सभासदांचे सहकार्य लाभेल असा विश्वास आहे.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उपक्रम :**

म. सा. परिषदेने हाती घेतलेले वाङ्मयेतिहास, वाङ्मयकोश, संशोधन यांसारखे उपक्रम यापुढेही चालू राहणार आहेत. परिषदेच्या शाखा अधिक कार्यरत व्हाव्यात, त्यांच्या अडचणी समजावून घ्याव्यात यासाठी शाखा प्रतिनिधींचा एक मेळावा घेण्यात आला. परिषदेच्या वतीने अनेक व्याख्यानमाला आयोजित करण्यात येतात. त्या शाखांच्या ठिकाणी आयोजित केल्यास चांगला प्रतिसाद मिळेल अशी अपेक्षा आहे. परिषदेची विभागीय साहित्य संमेलने यापूर्वी पुणे ( अध्यक्ष : डॉ. शं. गो. तुळपुळे ), महाबळेश्वर ( अध्यक्ष : बा. भ. बोरकर ), आणि कल्याण ( अध्यक्ष : रणजित देसाई ) येथे यशस्वीपणे भरविण्यात आली. परंतु मध्यंतरीच्या एका तपाच्या कालावधीत ती खंडित झाली होती. या वर्षापासून अशी विभागीय साहित्य संमेलने भरविण्यासाठी नवी कार्यकारिणी प्रयत्नशील आहे. परिषदेकडून ग्रंथपारितोषिके प्रत्येक वर्षी दिली जातात. या वर्षापासून एक अभिनव पारितोषिक कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी जाहीर केले आहे. प्रत्येक वर्षी आपल्या लेखनाने प्रभाव टाकणाऱ्या एका साहित्यिकास परिषदेकडून दोन हजार रुपयांचे पारितोषिक आणि मानचिन्ह दिले जाणार आहे. परिषदेच्या वर्धापनदिनी समारंभपूर्वक ते देण्याची कल्पना आहे. हा उपक्रमही सर्वांना आवडेल.

परिषदेचे त्रैमासिक ' महाराष्ट्र साहित्य पत्रिका ' नियमित आणि अधिक वाचनीय स्वरूपात देण्याचा आमचा प्रयत्न राहील. वाचकांनी ' पत्रिके 'विषयीच्या आपल्या कल्पना कळविल्यास त्यांचा जरूर विचार केला जाईल. ' पत्रिके 'त प्रसिद्ध होणाऱ्या किंवा तत्कालीन महत्त्वाच्या विषयांवरील वाङ्मयीन चर्चात्मक प्रतिक्रियांनाही ' पत्रिके 'त स्थान दिले जाईल. साहित्यसंस्थांच्या नियतकालिकांच्या प्रकाशनात अनेक अडचणी असतात, परंतु लेखक आणि वाचक यांच्या हार्दिक सहकार्याने त्यावर मात करता येईल; असा आम्हाला विश्वास आहे. वाचकांच्या विधायक सूचनांची आणि सहकार्याची अपेक्षा आहे.

**श्री. शिरवाडकर यांचा गौरव :**

विख्यात नाटककार आणि कवी श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) यांना मराठी नाट्य परिषदेतर्फे 'नाटककार राम गणेश गडकरी' यांचे स्मृत्यर्थ रु. १०,००० चे पारितोषिक देण्यात येणार असल्याचे नुकतेच जाहीर झाले आहे. प्रस्तुत पारितोषिक प्रथमतःच मिळण्याचा मान 'नटसम्राट' कर्त्यास मिळत आहे ही फार औचित्यपूर्ण घटना आहे. श्री. शिरवाडकर आणि मराठी नाट्य परिषद या उभयतांचे या निमित्ताने परिषदेतर्फे मनःपूर्वक अभिनंदन.

**संशोधकांचा मित्र :**

सुप्रसिद्ध इतिहास संशोधक आणि 'भारत इतिहास संशोधक मंडळा'चे कार्याध्यक्ष श्री. ग. ह. तथा तात्यासाहेब खरे यांचे दि. ५ जून १९८५ रोजी दुःखद देहावसान झाले. आयुष्याच्या प्रारंभीच्या काळात स्वातंत्र्य आंदोलनात हिरीरीने भाग घेणारे तात्या नंतर इतिहास संशोधनाच्या क्षेत्राकडे वळले आणि तेथेच रमले. १९२९ मध्ये भा. इ. सं. मंडळात नोकरी धरल्यापासून क्यूरेटर, चिटणीस आणि कार्याध्यक्ष ही पदे त्यांनी यथार्थतेने भूषविली. संशोधनासाठी आवश्यक अशा संस्कृत, उर्दू, फार्सी, कन्नड, हिंदी, इंग्रजी यांसारख्या भाषा आणि ब्राह्मी, खरोष्ठी, कन्नड, अरबी, मोडी इ. लिप्या अवगत करून घेतल्या. मूर्तिविज्ञान आणि नाणकशास्त्र या क्षेत्रात आपले प्रभुत्व प्रस्थापित करून त्या क्षेत्रात त्यांनी आपला दबदबा निर्माण केला. भारतीय मुद्राशास्त्र परिषद, अखिल भारतीय इतिहास परिषद यांची अध्यक्षपदे त्यांच्याकडे चालत आली. पुणे विद्यापीठाने गेल्याच वर्षी डी. लिट् ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला. ते मान्यताप्राप्त संशोधन मार्गदर्शक होते. त्यांच्या मार्गदर्शनाने काही विद्यार्थ्यांनी पी एच. डी. पदवीही संपादित केली. सुमारे ५६ पुस्तके आणि शेकडो शोधनिबंध त्यांनी लिहून प्रसिद्ध केले. 'मूर्तिविज्ञान' आणि 'संशोधकाचा मित्र' हे त्यांचे ग्रंथ बहुमोल आणि अजोड आहेत. अनेक संस्कृत मराठी हस्तलिखिते, चित्रे, नाणी, ऐतिहासिक कागदपत्रे यांचा प्रचंड संग्रह तात्यांनी इतिहास संशोधक मंडळात केला. नवोदित संशोधकांना, जिज्ञासूंना माहिती देण्यास ते सदैव तत्पर असत, तसे अनेक लब्धप्रतिष्ठितांच्या ग्रंथातील दोषही ते परखडपणे आणि निर्भयपणे दाखवून देत. महाराष्ट्र साहित्य परिषदेशीही त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. परिषदेने प्रकाशित केलेल्या 'भाषा व साहित्य संशोधन' या ग्रंथासाठी त्यांनी लेखन केलेले आहे. त्यांच्या निधनाने सर्वार्थाने 'संशोधकांचा मित्र' हरपला आहे.

**'प्रकाशकराजे' देशमुख :**

देशमुख आणि कंपनी या विख्यात प्रकाशनसंस्थेचे संचालक रा. ज. देशमुख हे मराठी प्रकाशन-क्षेत्रातील एक बलदंड व्यक्तिमत्त्व होते. १ जून १९८५ रोजी निलेगाव येथे त्यांचे निधन झाले. मराठीतील मातब्बर साहित्यिकांची पुस्तके त्यांनी प्रकाशित केली आणि कित्येकांचे साहित्यगुण हेरून त्यांना मातब्बर बनविले. उत्तम वाङ्मयीन मूल्ये आणि निर्मितीमूल्ये ही त्यांच्या प्रकाशनांची वैशिष्ट्ये होती. त्यासाठी कोणतीही तडजोड त्यांनी स्वीकारली नाही. साने गुरुजी, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, इरावती कर्वे,

नरहर कुरुंदकर, पु. ल. देशपांडे, रणजित देसाई यांसारख्या प्रतिभासंपन्न लेखकांची पुस्तके त्यांनी दिमाखदार स्वरूपात प्रकाशित केली. आपल्या लेखकांचे त्यांना अपार प्रेम आणि अभिमान असे. त्यांचे जाहीर कौतुक सोहळे करण्यात त्यांना आनंद वाटे. त्यांची वाङ्मयीन अभिरुची चोखंदळ होती, याची साक्ष 'धार आणि काठ' या ग्रंथातील त्यांच्या पत्रव्यवहारावरून पटू शकते. अत्यंत गरिबीतून काबाडकष्ट करीत ते पुढे आले आणि तसे फारसे शिक्षण नसतानाही मराठीतील एका नामवंत प्रकाशनसंस्थेचे ते धनी बनले आणि साहित्य / प्रकाशन क्षेत्रात स्वतःचे असे स्थान त्यांनी निर्माण केले. १९८३ मध्ये खोपोली येथे भरलेल्या म. सा. परिषदेच्या ग्रंथव्यवहार परिषदेत उत्कृष्ट प्रकाशक म्हणून त्यांचा सत्कार करण्यात आला होता. काही काळ महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ते कार्यवाह होते. परिषदेच्या वतीने प्रकाशित झालेल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड ४ आणि ५ या प्रा. रा. श्री. जोग संपादित ग्रंथांच्या प्रकाशनात त्यांचा वाटा मोठा होता. या खंडाच्या निर्मितीवर त्यांची मुद्रा उमटलेली आहे. भारताच्या पंतप्रधान कै. इंदिरा गांधी यांच्या हस्ते त्या ग्रंथाचा भव्य प्रकाशन समारंभही त्यांनी साजरा केला. परिषदेचे ग्रंथालय आणि कार्यालय यात एक शिस्त आणण्याचा त्यांनी प्रयत्न केला. हे सर्व करीत असताना त्यांच्या थोड्या रांगड्या स्वभावामुळे आणि वागण्यामुळे काही संघर्ष निर्माण झाले, वादळे उठली. संस्थात्मक कार्यात सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची आवश्यकता असते, याकडे त्यांचे दुर्लक्ष झाले आणि त्यामुळे या संस्थांपासून त्यांना दूर जावे लागले. त्यांचा स्वभाव रांगडा पण दिलदार होता. काही वेळा शिष्ट मान्य संकेतांना झुगारून देणारा होता. त्यांचा अखेरचा काळ काहीसा एकाकी अवस्थेत गेला. त्यांच्या निधनाने मराठी प्रकाशन क्षेत्रातील एक वादळी व्यक्तिमत्त्व नाहीसे झाले आहे.

**'कथासूर्य' पानवलकर :**

सुप्रसिद्ध कथाकार श्री. दा. पानवलकर यांचे दि. १९ ऑगस्ट रोजी सांगली येथे निधन झाले. आगळा आशय आणि शैली यामुळे आधुनिक मराठी कथासाहित्यात त्यांनी स्वतःचे वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केले होते. महाराष्ट्र शासनाने त्यांच्या 'औदुंबर' आणि 'जांभूळ' या कथासंग्रहांना पारितोषिके दिली होती. 'सूर्य' 'चिनाव' हे त्यांचे अन्यसंग्रहही प्रसिद्ध आहेत आणि 'शूटिंग' हा लेखसंग्रह लौकरच प्रकाशित व्हावयाचा आहे. श्री. दा. पानवलकर यांच्या निधनाने मराठी कथाक्षेत्रातील एक समर्थ लेखक नाहीसा झाला आहे.

**शाहिरी काव्यसंग्राहक जिंतीकर :**

सुप्रसिद्ध शाहीर पठ्ठे बापूराव यांचे पट्टशिष्य बापूराव महादेव जिंतीकर यांचे पुणे येथे दि. १५ जून रोजी निधन झाले. पठ्ठे बापूरावांचे वाङ्मय त्यांनी प्रकाशात आणले, त्याचप्रमाणे सगनभाऊ, शाहीर प्रभाकर, शाहीर परशराम, होनाजी, राम जोशी, अनंत फंदी यांचीही कविता प्रकाशात आणली. शाहिरी काव्याचा त्यांचा संग्रह विपुल आणि विविध होता. शाहिरी वाङ्मयाच्या अभ्यासकांना आपल्याकडील संग्रहाचा ते मुक्तपणे लाभ घेऊ देत. अप्रकाशित अशी शाहिरी काव्याची संपदा प्रकाशित होण्याची गरज आहे. विशेषतः

आध्यात्मिक शाहिरी वाङ्मयाचे दालन उपेक्षित राहिले आहे. अशा शाहिरांचे अनेक आखाडे सर्व महाराष्ट्रभर पसरले आहेत. त्यांच्या परंपरा, त्यांची मौदिक कवने, ती गाण्याची / सादर करण्याची पद्धती यांचा अभ्यास हे संशोधकांना एक आवाहन आहे. कै. जिंतीकरांसारखी जुन्या पठडीतील माणसे आता दुर्मिळ होत आहेत आणि नव्या पिढीत आस्था राहिलेली दिसत नाही. अशा अवस्थेत या अप्रकाशित शाहिरी काव्याची जपणूक आणि प्रकाशन होण्याची नितांत गरज आहे.

मराठी आणि हिन्दी या दोन्ही भाषांत लेखन करणारे आणि अहिन्दी भाषिक लेखक म्हणून अनेक सन्मान मिळविणारे पुणे विद्यापीठाच्या हिन्दी विभागातील प्रपाठक डॉ. कृष्ण दिवाकर यांचे दि. १ जून रोजी हृदयविकाराने आकस्मिक देहावसान झाले. ' महाराष्ट्र का हिन्दी लोककाव्य ', ' भोसला दरबार के हिन्दी कवी ', ' हिन्दी साहित्य : शोध और समीक्षा ', ' संत गुलाबराव महाराज और उनका हिन्दी काव्य ' इ. त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शिवाय त्यांचे शंभरावर शोधनिबंध आणि समीक्षालेख प्रकाशित झाले आहेत. म. सा. परिषदेच्या ' भाषा व साहित्य : संशोधन खंड २ ' या ग्रंथाचे ते एक लेखक होते. जीवनाच्या ऐन बहराच्या काळात नियतीने त्यांना ओढून नेले आहे.

जुन्या पिढीतील एक विनोदी लेखक बाळकृष्ण वामन ऊर्फ बाबा फाटक यांचे दि. १३ जून रोजी मुंबई येथे निधन झाले. त्यांच्या कथा ' विहार ' आणि ' विविध वृत्त ' यांसारख्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होत. ' चाळीतील चाळे ', ' कारकुनाचे धंदे ' इ. त्यांचे संग्रहही प्रसिद्ध झाले आहेत. ' बलराम नांगरे ' या नावाने लेखन करणारे मराठी साहित्यिक गंगाधर रामचंद्र पाठक यांचे वयाच्या ६३ व्या वर्षी पुणे येथे दि. २७ जुलै रोजी देहावसान झाले. दैवरेखा, अपंगा इत्यादी कादंबऱ्या; अमृतपाश, सोन्याचा घाव इत्यादी कथासंग्रह आणि धनंजय, भीम—घटोत्कच इत्यादी नाटके त्यांनी लिहिली आहेत.

गेल्या काही महिन्यांत दिवंगत झालेल्या साहित्य आणि प्रकाशन क्षेत्रातील या महनीय व्यक्तींना आम्ही विनम्रपणे आमची भावांजली अर्पण करतो.

**' साहित्य पत्रिके 'चा पुढील अंक :**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा हा नव्या कार्यकारिणीच्या काळातील पहिला अंक तसा थोड्या घाईतच वाचकांच्या हाती येत आहे. या अंकात नांदेड येथे ऑक्टोबरच्या २५, २६ व २७ या तारखांस भरणाऱ्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे आणि म. सा. परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या व्यक्तिमत्त्वावर आणि साहित्यकृतींवर प्रकाश टाकणारे लेख दिले आहेत. श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखालील हे संमेलन यशस्वीपणे साजरे होईल, असा आम्हाला विश्वास वाटतो. दिवाळी अंकाची परंपरा ' साहित्य पत्रिके 'ने सुरू केली आहे. ' पत्रिके 'चा येता दिवाळी अंक **' कथा विशेषांक '** म्हणून प्रसिद्ध करण्याचे आम्ही योजिले आहे. या अंकासाठी मराठीतील नव्या दमाच्या तरुण कथाकारांचा सहभाग लाभणार आहे. हा दिवाळी अंकही ऐन दिवाळीत वाचकांना देण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोत.

**वसंत स. जोशी**

## परिक्रमा । परिक्रमा । परिक्रमा । परिक्रमा

—या अंकापासून 'परिक्रमा' हे सदर सुरू होत आहे. यात मराठी भाषा व साहित्य या विषयांसंबंधी कोठे काय घडले वा घडणार आहे याबद्दलची थोडक्यात माहिती दिली जाईल. मराठी भाषा व साहित्य या संबंधी आस्था बाळगणाऱ्या वा कार्य करणाऱ्या व्यक्तींनी व संस्थांनी आपापली माहिती वेळोवेळी परिषदेच्या कार्यालयात पाठवावी. योग्य ती प्रसिद्धी देण्यात येईल– सम्पादक

: महाराष्ट्रात जिल्हा स्तरावरील न्यायालयातून येत्या पाच वर्षात मराठीचा वापर करण्यात येईल, असे मुंबई उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश कोंडा माधव रेड्डी यांनी जालना येथे सांगितले.

: कै. डॉ. कृष्ण दिवाकर यांनी लिहिलेल्या 'संत एकनाथ जीवन और काव्य' या पुस्तकाला अडीच हजार रुपयाचे पारितोषिक – भारत सरकारच्या केंद्रीय हिंदी निदेशालयातर्फे जाहीर करण्यात आले आहे. डॉ. कृष्ण दिवाकर यांचे जून १९८५ मध्ये हृदयविकाराने निधन झाले.

: आचार्य अत्रे यांच्या ८७ व्या जयंतीनिमित्त खालील सहा पुस्तकांचे प्रकाशन झाले.

(१) श्रवण : कुसुमाग्रज; (२) अध्यापक अत्रे : आचार्य अत्रे; (३) अडम् तडम् : विंदा करंदीकर; (४) आम्ही : वसंत बापट; (५) गायवाट : शिरीष पै; (६) श्रीसमर्थ आणि समर्थ संप्रदाय : सेतुमाधवराव पगडी.

: कोल्हापूर येथील पुढारीचे संपादक श्री. गणपतराव जाधव यांना मुंबई पत्रकार संघातर्फे यंदाचा आचार्य अत्रे स्मृति सन्मान देण्यात आला.

: १ एप्रिल १९८१ ते ३१ मार्च १९८२ या वर्षी प्रकाशित झालेल्यापैकी २७६ पुस्तके राज्य पारितोषिक स्पर्धेसाठी आली. त्यातून ६१ पुस्तकांची पारितोषिकांसाठी निवड झाली. महाराष्ट्र राज्य सरकारने एकूण १ लाख १९ हजार रुपये त्यासाठी मंजूर केले.

: श्री. मनोहर शहाणे यांच्या 'पुत्र' या कादंबरीचे पटकथेत रूपान्तर केल्याबद्दल श्री. सुभाष सोनवणे यांनी पटकथा लेखन स्पर्धेत पारितोषिक पटकावले.

: ‘ पु. भा. भावे : साहित्यस्वरूप व समीक्षा ’ या ग्रंथाबद्दल डॉ. वसंत वऱ्हाडपांडे यांना एक हजार रुपयांचे पारितोषिक देण्यात आले.

: ‘ अनादि मी, अनंत मी ’ या १९८४ मधील सर्वोत्कृष्ट नाट्यलेखनाबद्दल श्री. माधव खाडिलकर यांना एक हजार रुपयांचे पारितोषिक देण्यात आले.

: मराठी साहित्य सम्मेलन २५ ते २७ ऑक्टोबर १९८५ रोजी नांदेड येथे भरणार आहे.

: सर्वोत्कृष्ट वाङ्मयीन कामगिरीबद्दल दरवर्षी एका साहित्यिकाला रोख दोन हजार रुपये आणि मानचिन्ह या स्वरूपात ‘ महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक ’ देण्यात येणार आहे.

: सुचित्रा सुनील कुलकर्णी, पुणे यांच्या ‘ आचार्य अत्रे यांचे अग्रलेख ’ या विषयावरील प्रबंधाला एस. एन्. डी.टी विश्वविद्यालयाने पीएच.डी. पदवी दिली.

: श्री. बाबुराव अर्नाळकर ( जन्म ९ जून १९०७, चन्द्रकांत सखाराम चव्हाण ) यांनी इ. स. १९३६ साली पहिली रहस्यकथा लिहिली. आजवर ‘ १२ शे रहस्य कथा लिहिणारा विक्रमवीर ’ असा त्यांचा गौरव करण्यात येतो. कै. यशवंतराव चव्हाण यांनी त्यांना दहा हजार रुपये देऊन गौरविले. ‘ वैतरणेच्या काठावर ’ हे त्यांचे आत्मचरित्र प्रसिद्धीच्या मार्गावर आहे.

: स्वराज्य साप्ताहिकाने आयोजित केलेल्या कथा स्पर्धेत एकूण ५१० कथा आल्या. त्यातील पहिल्या तीन कथांना रु. २००, १५० व १०० अशी पारितोषिके देण्यात आली.

: १५ ऑगस्ट १९८५ च्या स्वातंत्र्यदिनानिमित्त १४ पंडितांना राष्ट्रपतींनी गौरवपत्रे जाहीर केली. त्यात विक्रम विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू डॉ. प्र. न. कवठेकर यांचा समावेश आहे.

: वाई येथे १७ ऑक्टोबर ते २ नोव्हेंबर १९८५ पर्यंत राज्य पातळीवरील हौशी नाट्य संस्थांच्या नाट्यस्पर्धा होणार आहेत. यशस्वी ठरणाऱ्या पहिल्या तीन क्रमांकांना फिरते रौप्य करंडक आणि अनुक्रमे २५००, १५००, १००० रुपयांची रोख बक्षिसे देण्यात येतील. संपर्क : संकेत थिएटर्स, वाई ( जि. सातारा )

: १९८४ चा १॥ लाख रुपयांचा भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार मल्याळी भाषेतील श्रेष्ठ साहित्यिक श्री थकाझी शिवशंकर पिल्लै (७१) यांना मिळाल्याचे जाहीर झाले आहे. त्यांनी चेम्मीन, रणनितांगडी, कायर आदी ३५ कादंबऱ्या, ५०० लघुकथा लिहिल्या असून प्रवासवर्णने, लघुनिबंध, नाटके इत्यादी विविध साहित्य-प्रकार हाताळले आहेत.

: कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड येथील मराठी विभाग प्रमुख डॉ. पंडित आवळीकर दि. २७ ऑगस्ट रोजी मॉस्कोस रवाना झाले. विद्यापीठ अनुदान मंडळाच्यावतीने पुश्किन साहित्याचा विशेष अभ्यास करण्यासाठी त्यांची निवड झाली असून ऑक्टोबर अखेर ते भारतात परत येतील.

: श्री. माधव कोंडविलकर यांच्या ‘ मुक्काम पोस्ट : देवाचे गोठणे ’ या पुस्तकाचा फ्रेंच भाषेमधील अनुवाद नुकताच प्रसिद्ध झाला आहे.

—ना. वा. मराठे

# माझे मित्र शंकर पाटील

द. मा. मिरासदार

श्री. शंकर पाटील आणि मी दोघेही गेली तीस-बत्तीस वर्षे लिहितो आहोत. लेखक असूनही आमची मैत्री इतकी वर्षे कायम राहिली आहे. एक गमतीचा योगायोग असा की, ज्या सत्यकथेच्या अंकात त्यांची 'कारवान' या नावाची पहिलीच कथा प्रसिद्ध झाली त्याच अंकात माझीही पहिलीच कथा छापून आली होती. म्हणजे आमचा लेखन प्रवास एकाच वेळी, अगदी एकाच ठिकाणाहून सुरू झाला म्हणानात.

त्यांची माझी भेट चारपाच वर्षांनी पुढे केव्हातरी झाली. त्यांची ही भेट नेमकी केव्हा आणि कुठे झाली हे आता नीटसे आठवत नाही. बहुधा ते १९५५-५६ हे वर्ष असावे. मी त्या वेळी बी. टी. चा अभ्यासक्रम पुरा करीत होतो आणि त्याचवेळी आकाशवाणीवर कामही करीत होतो. श्री. व्यंकटेश माडगूळकर हे त्या वेळी नुकतेच आकाशवाणीवर ग्रामीण विभागाचे प्रमुख म्हणून रुजू झाले होते. त्यांना भेटायला म्हणून काही नवोदित लेखक मंडळी आकाशवाणीवर आली. त्यात बारामतीला मुख्याध्यापक म्हणून काम करणारे शंकर पाटील हेही होते. बहुधा तेथेच त्यांची माझी पहिली भेट झाली असावी.

पाटील यांना पहिल्यांदा पाहिले तेव्हा माझा तसा अपेक्षाभंगच झाला. पाटील हे आडनाव तसे भारदस्त. ऐकणाऱ्याच्या मनात दवदवा उत्पन्न करणारे. त्या काळात तर महाराष्ट्रात पाटील मंडळींचा दबदबा वाढत्या प्रमाणात. त्यामुळे शंकर पाटील नावाचे हे लेखक चांगले उंचेपुरे, शरीराने दांडगेदुंडगे, भरघोस मिशा असलेले, कदाचित डोईवर कोल्हापुरी शेमलाही असणारे असे गृहस्थ असावेत अशी माझी समजूत होती. खरे म्हणजे लेखकाचे लेखन आणि त्याचे व्यक्तिमत्त्व याचा तसा काही संबंध नसतो. दोन्हीत पुष्कळदा विसंगतीच असते. पण तरी माझ्या कल्पनेने मी त्यांचे व्यक्तिमत्त्व मनाशी तसे रेखाटले होते खरे. कदाचित त्या वेळच्या ग्रामीण चित्रपटांचा तो परिणाम असावा. ग्रामीण चित्रपटांतील त्या वेळचा पाटील हा असा उंचापुरा बलदंड आणि मिशाबाज असायचा.' 'गडी अंगानं उभा नी आडवा' हे त्याचे सिनेमातले रूप असे. चित्रपटाच्याच भाषेत सांगायचे म्हणजे 'मायथॉलॉजिकल फिगर.' पण हे पाटील अगदीच वेगळे होते. बुटके, शरीरानं कृश आणि चांगले भांग पडणारे, चष्मा लावणारे. त्यांचे बोलणेही सिनेमातल्या पाटलासारखे गुरगुरल्यासारखे नव्हते. ते सौम्य पण आपला मुद्दा मांडताना आवेशपूर्ण असे काहीसे होते. डोळ्यात मात्र एक वेगळी चमक होती. साहित्यासंबंधी आवेशपूर्ण भाषेत बोलताना हे डोळे चमकत. समोरच्या माणसाला जोखल्यासारखे पहात.

एकूण काय की, 'पाटील' या नावाच्या लेखकाला प्रथम पाहिले तेव्हा माझी थोडी निराशाच झाली. हे पाटील पुढे पुण्यात येतील आणि त्यांच्या माझ्यात मैत्रीचे एवढे निकटचे बंध निर्माण होतील अशी कल्पनाही त्या वेळी आली नाही. पण तसे झाले खरे! पाटलांनी बारामतीची शिक्षकाची नोकरी सोडली आणि ते पुण्यात आकाशवाणीवर माडगूळकरांचे साहाय्यक म्हणून काम करू लागले. मी नेमके उलटे केले. आकाशवाणी सोडली आणि पुन्हा शिक्षणक्षेत्रात पदार्पण केले. पण लेखन हे समान शील किंवा व्यसन असल्यामुळे आमची रोज गाठ पडू लागली. रोज संध्याकाळी आम्ही फिरायला जात असू, बरोबर इतरही मित्रमंडळी असत. कधी कधी माडगूळकरही असत. आम्ही सगळे एकाच वयाचे होतो. साहित्यासंबंधी आम्हा सर्वांनाच एक जबरदस्त आकर्षण होते. अंगात उदंड उत्साह होता. आम्ही सगळेच लिहीत होतो. एकमेकांचे वाचीत होतो. त्यावर तितक्याच उत्साहाने बोलत होतो. जे लिहिले त्याहीपेक्षा जे लिहाव-याचे योजले आहे त्याची आपापसात मनःपूर्वक चर्चा

करीत होतो; वाद करीत होतो. एकूण ते आमचे वयच उमेदीचे होते. नव्या नव्या आकांक्षा मनात बाळगण्याचे होते. आम्हाला तेव्हा भूतकाळ नव्हता, प्रचंड भविष्य-काळ समोर पसरला होता आणि या भविष्यकाळाची जडणघडण आपल्यालाच करायची आहे हा जबरदस्त आत्मविश्वास आमच्या नसानसात फुरफुरत होता. ते दिवसच सोनेरी होते, मंतरलेले होते.

पाटील ह्या काळात आणखी एका वेगळ्या मनः-स्थितीत होते. एका लहानशा गावी मुख्याध्यापक असताना त्यांनी शाळेतल्याच एका मुलीवर प्रेम केले होते. दोघांची जात भिन्न. त्यामुळे या प्रेमप्रकरणाचा शेवट विवाहात होणे कठीण होते. मुलीच्या घरी हे प्रकरण समजले होते आणि मुलीला घराबाहेर पडण्याची बंदी झाली होती. त्यानंतर बदली होऊन बारामतीत काम करून पाटील आता पुण्याला आले होते. त्यामुळे ते विरही नायकाच्या मनःस्थितीत होते. मुलीला त्या गावा-हून घेऊन पुण्याला यावे आणि लग्न करावे असा त्यांचा बेत होता. पण या बेताला अनेकांचे सहकार्य मिळणे आवश्यक होते. आमच्या काही निवडक मित्रमंडळीत ही गोष्ट निघायची आणि पाटील आपले मनोगत व्यक्त करायचे. आम्हाला हे सगळेच प्रकरण रोमांचकारक वाटायचे. कथा-कादंबऱ्या आणि सिनेमा यापलीकडे 'प्रेम' या वस्तूशी माझा कधी संबंध आलेलाच नव्हता. काही प्रत्यक्ष घडलेली जवळपासची प्रेमप्रकरणे कानावरून गेली होती. पण 'दृकप्रत्यय' शून्य होता. त्यामुळे आपला एक तरुण लेखकमित्र प्रेमात पडलेला आहे, त्यातूनही ती मुलगी वेगळ्या जातीची आहे आणि हा विवाह होण्यात अनेक अडथळे आहेत हे कळल्यावर पाटील यांना मदत करण्याची आम्हाला सुरसुरी आली. माझा नातेवाईक आणि लेखकमित्र श्री. मधुसूदन अक-लूजकर हा तर त्यांच्या सुखदुःखाशी फारच समरस झाला. त्या दोघांची नित्य काही तरी खलबते चालत. शेवटी केव्हा तरी हे दोघेही टॅक्सी करून त्या गावी गेले. टॅक्सीत त्या मुलीला बसविले आणि तिला घेऊन पुण्याला ही यशस्वी जोडी परत आली. त्यानंतर एकदोन दिवसा-तच नोंदणी पद्धतीने श्री. पाटील यांचा विवाह महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सभागृहात साजरा झाला. प्रेमप्रक-रणाची परिणती अखेर आनंदपर्यवसायी ठरली.

ते दिवस मला अजून आठवतात. त्या काळात पाटील हे खूप अडचणीत होते. आकाशवाणीवरील लहानसा पगार. रहायला जागा नाही म्हणून तूर्त एका लॉजमध्ये टाकलेला मुक्काम. त्यातच पत्नीपदावर आरूढ झालेल्या तरुण मुलीची जबाबदारी. मुलीला तर नव्या चपला, बदलायला साडी इथपासून प्रत्येक गोष्ट विकत घ्यावी लागली, पण हे सगळे कसोटीचे दिवस त्या तरुण प्रेमिकांनी मोठ्या धैर्याने काढले. इतर लेखक-मित्रांनीही या काळात त्यांना पुष्कळ मदत केली. पळवून आणलेल्या अन्य जातीतील मुलीशी तिच्या नातेवाईकांच्या इच्छेविरुद्ध केलेला हा विवाह. याचे परिणाम काय होतील याची त्यांना पूर्ण कल्पना असणे कठीण होते. तसे ते स्वभावाने थोडेफार भित्रेही असावेत. निदान 'पोलिस' या प्राण्याचा धसका त्यांना त्या काळात तरी होता. मुलीला पुण्यात आणल्यानंतर एकदोन दिवसातलीच गोष्ट.अगदी सकाळी पाटील लॉजच्या बाहेर पडले आणि टिळक रोडवरील एका हॉटेलमध्ये चहा पिण्यासाठी म्हणून गेले. चहा घेऊन बाहेर पडतात तोच त्यांना दिसले की, ज्या रस्त्यावर त्यांचे हे 'लॉज' होते त्या रस्त्यावर तीनचार ठिकाणी पोलीस उभे राहिलेले. नाही म्हटले तरी ते विचकले. लॉजवर परत न जाता थेट सुभाषनगरमधील माझ्या घरी आले आणि कावऱ्याबावऱ्या मुद्रेने त्यांनी हा सर्व वृत्तांत मला सांगितला. बहुधा मुलीचे नातेवाईक पुण्यात पोचले आणि त्यांनी बरोबर पत्ता काढला, त्यामुळेच हे पोलीस आले असावेत अशी त्यांची कल्पना. मी म्हटले, "चल, पाहू तरी खरा प्रकार काय आहे तो–" आणि आम्ही दोघेही बाहेर पडलो. टिळक रोडवरील ह्या रस्त्याला आलो. पाटील यानी सांगितलेले खोटे नव्हते. खरोखरीच त्या रस्त्यावर तीनचार ठिकाणी तरी पोलीस उभे असलेले दिसले. कुतूहल म्हणून मी पहिल्याच पोलिसाला विचारले,

"का हो हवालदार, आज या रस्त्यावर पोलीस का उभे आहेत?"

हवालदार शांतपणे म्हणाले,

"गव्हर्नरसाहेब पर्वतीवर जायचे आहेत ना, म्हणून हा पोलीसबंदोबस्त. आता येईलच त्यांची गाडी."

दूर उभ्या असलेल्या पाटील यांना मी हा शोध सांगितला तेव्हा त्यांच्या मनावरचा ताण एकदम कमी झाला आणि आम्ही दोघेही हसू लागलो. पाटीलही मग निश्चिंतपणे आपल्या लॉजकडे परत गेले.

अशा त्या वेळच्या एकेक गंमती.

पुढे पाटील यांनी सोमवार पेठेत आपले नवे बिऱ्हाड थाटले आणि त्यांचा नवा संसार तेथे सुरू झाला. हळूहळू अडचणी दूर होत गेल्या; स्थैर्य आले. लेखनासाठी त्यांना शिष्यवृत्ती मिळाली. आकाशवाणी सोडून ते स्वतंत्रपणे लेखनावर उपजीविका करू लागले. चित्रपटाची कामे आली. मुलेबाळे झाली आणि उत्तरोत्तर ते यशाची नवीनवी शिखरे गाठीत गेले, या त्यांच्या वाड्यातच आमचे दुसरे मित्र पंडित शेटे हे राहत. या दोघांनाही भेटण्यासाठी मी मधून मधून सोमवार पेठेत जात असे. तेथे गेलो की चहापाणी, गप्पागोष्टी तासन् तास चालत. साहित्य, साहित्यिक, चित्रपट यांचे विषय निघाले की, वेळ कसा जाई हे कळत नसे. याच सोमवार पेठेतील त्यांच्या बिऱ्हाडी एकदा अलीकडे खूप प्रसिद्धीस आलेले एक काँग्रेस नेते आले. ते पाटील यांच्या कारकीर्दीत केव्हातरी त्यांचे विद्यार्थी होते. त्यांनी काँग्रेसच्या प्रचारासाठी काँग्रेस सेवादल पथक काढले होते. या कलापथकासाठी त्यांना पाटील यांच्याकडून एखाद्या वगनाट्यासारखे लेखन हवे होते. पाटील यांच्या बिऱ्हाडी जाऊन त्यांनी ही मागणी केली. पण पाटील यांचा पिंड राजकारणाचा नव्हता आणि आजही नाही. ते त्यांना म्हणाले,

" मी साहित्यातील माणूस आहे. साहित्यासंबंधीच्या माझ्या काही निष्ठा आहेत. तुमच्या या राजकारणात मला तसा काही रस नाही. तेव्हा माझ्या हातून या प्रकारचं लेखन लिहून होणार नाही. तुम्ही माझा नाद सोडा."

पाटील यांनी हे लेखन केले असते तर त्याचा भविष्यकाळात त्यांना निश्चितच फायदा झाला असता. कारण सत्तेवर असलेल्या पक्षाचे ते काम होते. पण हे प्रलोभन त्यांनी जुमानले नाही. हा त्यांचा एक प्रकारे मोठेपणा म्हणावा लागेल. काही निष्ठा त्यांनी जपल्या आहेत ही गोष्ट खरी.

पण आम्ही खरे आणखी जवळ आलो ते ' कथाकथन ' या कार्यक्रमामुळे. हा कार्यक्रम तुम्ही कसा सुरू केलात, त्याची प्रेरणा कशी मिळाली, असे प्रश्न अनेकजण विचारतात. १९६२ मध्ये नागपूरला धनवटे रंगमंदिरात आम्ही पहिल्यांदा ' कथाकथन ' केले. तोपर्यंत आम्ही गोष्टी वाचून दाखविण्याचा कार्यक्रम मधून मधून करीत होतो. पण त्याचे यश मर्यादित होते. कथावाचनात डोळे पुस्तकाच्या पानाकडे लागलेले असतात. समोर बसलेल्या श्रोत्यांशी संवाद होत नाही.

' कथाकथना 'त मात्र हा संवाद होतो. त्याचा प्रारंभ नागपूरला झाला. आम्ही सगळ्यांनी आपापल्या गोष्टी पाठ केल्या होत्या. समोर नागपुरातील रसिक श्रोतृवृंद बसला होता. कार्यक्रम कसा होईल याची आम्हाला काळजीच वाटत होती. मनावर फार मोठा ताण होता. पण तो कार्यक्रम यशस्वी झाला. श्री. पाटील यांनी ' खलिता ' नावाची गोष्ट त्या वेळी सांगितली, असे मला आठवते. त्यातील ग्रामीण मंडळी, त्यांचे अज्ञान आणि पाटलांच्या ग्रामीण संवादाचा ठसका यामुळे त्यांची ही गोष्ट रंगत गेली. आम्हाला एक परीस सापडल्याचा आनंद झाला. पुढे पाटील यांनी अनेक गोष्टी कथाकथनात आणल्या. त्यांची ' मीटिंग ' ही गोष्ट खूप लोकप्रिय झाली. एका खेड्यातील ग्रामपंचायतीची मीटिंग कशी भरते ( म्हणजे शेवटपर्यंत कशी भरतच नाही ) याचा तो मजेदार किस्सा आहे. त्यात नानातऱ्हेची पात्रे येतात. पाटील हे स्वतः चांगले नटही आहेत. त्यामुळे ती ती पात्रे ते हुबेहूब श्रोत्यांच्या समोर उभी करतात. एके ठिकाणी मात्र ही गोष्ट ऐकून एक काँग्रेसचे पुढारी खवळले. मध्यंतरात पाटलांना भेटून ते रागारागाने म्हणाले, " ही खेड्यातल्या शहाण्यांची गोष्ट सांगितलीत. आता शहरातल्या शहाण्यांची सांगा की !...... " अशा अरसिक श्रोत्यांना उत्तर काय द्यायचे कपाळ ! पाटील फक्त हसले त्यांच्याकडे बघून आणि त्यांनी ' अरसिकेषु ' आणखी ' कवित्वनिवेदन ' करण्याचे कौशल्याने टाळले. पण हे असे उदाहरण अपवादात्मक. एरवी त्यांच्या कथा रंगतात, त्यातील अस्सल ग्रामीण जीवन आणि नाट्यपूर्ण संवाद यांनी ते वातावरण जिवंत होते. पाटील यांच्या ' नाटक ', ' धिंड ', ' पाहुणचार ' या गोष्टीही पुढे खूप रंगल्या. ' धिंड ' ही कथा तर अत्यंत लोकप्रिय. कुठेही गेलो तरी ' धिंड ' कथा सांगा, हा लोकांचा आग्रह कायम असतो. ' धिंड ' हे कथेचे नाव जाहीर झाले की, लोक टाळ्यांचा गजर करतात आणि आपल्या पसंतीची पावती देतात. कथाकथनात या कथेइतकी लोकप्रियता क्वचितच एखाद्या गोष्टीला लाभली असेल ! त्यांच्या ' ढांग टक ढांग टक ' या हलगीला तर हमखास टाळी पडते. पाटलांच्या या कथातून ग्रामीण जीवनाचे अस्सल दर्शन तर घडते. पण त्यांच्यात एक कुशल नकलाकार

आणि नटही दडून बसला आहे याचाही सुरेख प्रत्यय येतो. कथेतील लहानमोठी माणसे, बायका यांचे बोलणे अगदी हुबेहूब त्यांच्या तोंडून ऐकायला मिळते. खाजगी गप्पागोष्टीत ते रंगात आले की काही नकला छान करून दाखवतात. ग. दि. माडगूळकर यांच्या 'वऱ्हाडी आणि वाजंत्री' या चित्रपटात आम्ही तिघांनीही गंमत म्हणून लहान लहान भूमिका केल्या होत्या. पाटील यांनी त्यातल्या कानडी गड्याची भूमिका केली होती. ती छोटीशी भूमिकाही त्यांनी रंगवून दाखविली.

पाटील यांनी पुढे वगनाट्ये लिहिली ती सगळीच लोकप्रिय झाली. 'कथा अकलेच्या कांद्याची' हे वगनाट्य तर अजूनहि चालते. निळू फुले हे प्रसिद्ध नट याच वगनाट्यातून पुढे आले. निळू फुले यांची चित्रपटातील 'झेलेअण्णा' ही भूमिका गाजली ती निर्मितीही पाटील यांचीच. त्यावेळी कानडीमिश्रित मराठी कसे बोलले जाते हे निळू फुले यांना नेमके माहीत नव्हते. श्री. पाटील यांनीच त्यांना ते संवाद पुन्हा पुन्हा म्हणून दाखवून मार्गदर्शन केले होते असे चित्रपटातील मंडळी सांगतात. चित्रपटाच्या क्षेत्रात तर पाटलांनी उदंड यश मिळवले. आतापर्यंत त्यांनी लिहिलेल्या चित्रपटांची संख्या अर्धशतक ओलांडून पुढे गेली असेल. त्या काळात प्रतिवर्षी त्यांना चित्रपटातील लेखनाची पारितोषिके आहेत. त्यांच्या घरी स्मृतिचिन्हांची रांगच्या रांग पाहिली म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाची कल्पना येते. लेखनाच्या क्षेत्रात स्वतःच्या मर्जीनेच लिहिणारे पाटील चित्रपटाच्या क्षेत्रात तडजोडी का करतात? हा प्रश्न कुणीतरी त्यांना विचारला तेव्हा ते म्हणाले, "मीही सुरुवातीस या बाबतीत आग्रही होतो. माझा पहिला चित्रपट 'वावटळ' मी लिहिला त्यावेळी या लिखाणात कसलाही फेरबदल होता कामा नये असा मी हट्ट धरला होता. तो चित्रपट पडला. पुढं माझ्या लक्षात आलं की निर्माता हा लाखो रुपये यात ओतून चित्रपट निर्माण करतो. शेवटी तो एक व्यवसाय आहे. निर्मात्याचे पैसे बुडता कामा नये. त्याच्या पैशावर मी माझे लेखन-प्रयोग करणं हे इष्ट नाही. तेव्हा तडजोड केली पाहिजे. दुसरा मार्ग नाही."

कथा,कथाकथन, चित्रपट अशा अनेक क्षेत्रात पाटील यांनी फार मोठे यश मिळवले. अलीकडे 'बालभारती'त एक अधिकारी म्हणून ते काम करतात. मराठी विभागाचे प्रमुख म्हणूनही त्यांनी चांगली कामगिरी बजावली आहे. त्यांच्या देखरेखीखाली उत्तमोत्तम मराठी पाठ्य-पुस्तकांची निर्मिती झाली आहे. ग्रामीण लेखन करणाऱ्या या लेखकाने इंग्रजीतील उत्तम कथा-साहित्य वाचले आहे. मर्ढेकर हा त्यांचा आवडता कवी. मर्ढेकरांच्या कित्येक कविता ते तोंडपाठ म्हणून दाखवतात. आता त्यांची मुले मोठी झाली आहेत. पण मला आठवते– ती लहान होती तेव्हा संध्याकाळी घरी सायंप्रार्थना करावी तशी ती मर्ढेकरांच्या कविताही म्हणत. पाटील यांनीच त्या मुलांकडून तोंडपाठ करून घेतल्या होत्या. इतके त्यांचे मर्ढेकरांच्या कवितेवर प्रेम आहे. 'कोल्हापूरला महाविद्यालयात असताना साहित्यप्रेमी मित्र मिळाले. त्यांच्या सहवासामुळे माझी साहित्यनिष्ठा डोळस व्हायला मदत झाली' असे ते नेहमी म्हणतात. श्री. रणजित देसाई, विजया राजाध्यक्ष, जाधव, पुरुषोत्तम पाटील इ. अनेक मित्रांचा ते आवर्जून उल्लेख करीत असतात.

नांदेड येथे भरणाऱ्या ५९ व्या मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष म्हणून श्री. शंकर पाटील यांची निवड झाली आणि त्यांच्या साहित्यसेवेचा योग्य तो गौरव झाला. आज ठिकठिकाणी त्यांचे सत्कार होत आहेत. किंबहुना ते सत्कार आणि भाषणे यांनी ते अगदी कंटाळून गेले आहेत. पण मी जो त्यांचा सत्कार पाहिला तो मात्र अभूतपूर्व होता यात काही शंका नाही. कोल्हापूर पासून केवळ दहा मैलावर असलेले पट्टणकोडोली हे त्यांचे जन्मगाव. तेथेच त्यांचे बालपण गेले. या जन्मगावाने त्यांचा सत्कार केला व समारंभाला मी साक्षी होतो. किंबहुना पाटील यांनीच आग्रह करून मला आपल्या-बरोबर नेले होते. वेशीपाशीच सगळे गाव गोळा झाले होते. जवळपासच्या अनेक गावातून लोक आले होते. लेझीम, हलगी, गजीनृत्य यांच्या निनादात पाटलांची मिरवणूक त्यांनी काढली. म्हाताऱ्याकोताऱ्या बायका खूप गोळा झाल्या होत्या आणि मिरवणुकीच्या गर्दीत घुसून 'कुठं है आमच्या बाळाबाईचा संकर?' असा प्रश्न कौतुकाने विचारीत होत्या. ही मिरवणूक ग्रामदैवत जे विरोबा तिथपर्यंत गेली. विचाराने नास्तिक असलेले पाटील मुकाट्याने विरोबापुढे वाकले. तेथे त्यांना भंडार लावला. मग बैलगाडीतून गावभर मिरवणूक. दोन तास ही मिरवणूक चालली होती. तिचेच रूपांतर पुढे एका सभेत झाले. योगायोग असा की, पाटलांचा जन्म ज्या घरात झाला त्या घरासमोरच्या चौकातच या सभेचे व्यासपीठ होते. सभेला झाडून सारे गाव लोटले होते.

अनेकांची भाषणे झाली. आपल्या या सुपुत्राला गावकरी मंडळींनी अकराशे रुपयांची थैली दिली. फेटा बांधला. घोंगडे, चंची, अडकित्ता व वस्त्र या वस्तू प्रेमभराने भेट म्हणून दिल्या. इतकेच नव्हे तर सुंदर, नाजूक घोंगड्यावर लिहिलेले एक मानपत्रही त्यांना दिले. गळ्यात इतके असंख्य हार पडले की, पुढेपुढे पाटील यांची कृश मूर्ती पार दिसेनाशी झाली. दोन तीनदा हा हारांचा ढीग त्यांच्या गळ्यातून काढून ठेवावा लागला. पाटील यांनी फार सुरेख भाषण तर केलेच, पण अकराशे रुपयांची थैली (स्वतःचे शंभर रुपये घालून) त्यांनी गावच्या वाचनालयाला देऊन टाकली. स्वतःची सगळी पुस्तके त्यांनी बरोबर आणली होती. तीही त्यांनी वाचनालयास भेट म्हणून दिली. लोकांनी अगदी उत्स्फूर्तपणे प्रचंड टाळ्या वाजवून या गोष्टींचे स्वागत केले. त्या समारंभाची गोडी तो समारंभ प्रत्यक्ष पाहणारालाच कळावी.

पाटील आज तृप्त मनःस्थितीत आहेत. का असणार नाहीत? त्या समारंभात भाषण करताना मी सहज बोलून गेलो– "साहित्य संमेलनाचे आजपर्यंत अनेक अध्यक्ष झाले. त्यांचे यथोचित सत्कारही झाले, पण गावकऱ्यांनी आपल्या या कर्तबगार सुपुत्राला बोलावून ज्याचा असा हेवा करण्यासारखा सत्कार केला, असा हा पहिलाच अध्यक्ष असेल!"

□ □

---

## साभार स्वीकार

### कादंबरी

**शापित कोझाकीण** : अशोक डांगे (अनु.); कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे ३०; १९८५; रु. २० △ **बंगेचं रहस्य** : सत्यजित राय / बेलसरे वाली; श्रीविद्या प्रका. पुणे ३०; १९८५; रु. १५ △ **पारी**; चंद्रकांत जोशी; नीलकंठ प्रका. पुणे ३०; १९८५; रु. २१ △ **कृष्णवेध** : गो. नी. दाण्डेकर; मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; १९८५; रु. ५० △ **प्रास्ताविक** : ह. मो. मराठे; मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; १९८५; रु. ३५ △ **लहानू** : मदन हजेरी; स्पर्श प्रकाशन, राजापूर; १९८३; रु. ५ ( किशोर कादंबरी ) △ **पावा पुन्हा वाजला** : मदन हजेरी; सुंदर हजेरी, राजापूर १९८४; रु. १० ( किशोर काद. )

## साभार स्वीकार

### लेख-प्रबंध

**शोध स्वतःचा** : विद्यावाळ; श्रीविद्याप्रकाशन, पुणे ३०; १९८४; रु. २७.५० △ **संक्रमण** : सरोजिनी वैद्य; श्रीविद्या प्रका. पुणे ३०; १९८५; रु. ६० △ **दस्तयेवस्की**; अनिरुद्ध कुलकर्णी; कॉन्टिनेंटल प्रका. पुणे ३०; १९८५; रु. २५ △ **आचार्य भागवत संकलित वाङ्मय** : अ. के. भागवत-संपा.; महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९८३; रु. २५ △ **बकुळीची फुले** : प्र. श्री. नेरूरकर; सहयोग प्रकाशन, कुडाळ; १९८५ रु. १५ △ **माणूसनामा** : न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८५; रु. ४० △ **महाभारतातील अश्वत्थामा** : विजया देशमुख; कॉन्टिनेन्टल प्रका. पुणे ३०; १९८५; रु. ४० △

---

# दुःखाचा शोध घेणारे कथालेखक : शंकर पाटील

भालचंद्र फडके

विल्यम वर्डस्वर्थची कविता मला नेहमी आठवते. त्या काव्यपंक्ती अशा— My heart leaps up when I behold a rainbow in the sky. संवेदनाशील कविमनाचे हे लक्षण आहे ' जे रम्य ते वघुनिया ' एखाद्याच्या मनात गाणे जागे होईलं तर तुकारामासारखा कवी ' येणे दुःखे माझा फुटो पाहे प्राण ' असे म्हणेल. आजची परिस्थिती अशी बदलत चालली आहे की माणूस संवेदनाशून्य होत चालला आहे. कलावंताचे किंवा जातिवंत लेखकाच्या वाट्याला एक भाग्य आलेले असते आणि ते म्हणजे त्याची संवेदनशीलता जागी असते. म्हणून तर तो आपल्या कथेतून किंवा कवितेतून रसिकांशी संवाद साधीत असतो, त्याची जाणीव समृद्ध आणि व्यापक करीत असतो. पण या जातीचे लेखक दुर्मिळ असतात.

आमचे मित्र शंकरराव पाटील असेच एक संवेदनाशील कथालेखक. ' वेध ' या कथेत ते लिहितात—

> खरंच, कुठं आहेत अनुभव ? त्यांना शोधायचं तरी कुठं ? पण ते शोधून सापडतात असं तरी कुठं आहे ? ते यावे लागतात आपसुक... कथेचं कलम कुठं आणि कसं जुळेल काही सांगता येत नाही...कथा भेटली म्हणजे ती आपला पाठलाग करते. आपण पाठलाग करून काय उपयोग ? ती भेटायला हवी...
>
> खरंच काही कथा अशा जीव लावतात...

शंकर पाटलांनी काही कथा अशा लिहिल्या आहेत की त्यांच्यावर रसिक वाचकांचा जीव कायमचा जडतो.

चांगली कथा तुमच्या आमच्या मनात खोलवर रुजते. तिची सोबत आपल्याला कायमची लाभते. भुजंग, वळीव, आभाळ, ऊन, पाहुणी, नाटक, धिंड, भेटीगाठी, निचरा, भार इत्यादी कितीतरी कथा रसिकांच्या सदैव स्मरणात राहिल्या आहेत. म्हणून तर रसिक वाचकांचे अलोट प्रेम शंकररावांना लाभले आहे.

मे महिन्यात त्यांच्या जन्मगावी—पट्टण कोडोलीला— त्यांचा अभूतपूर्व सत्कार सोहळा पाहण्याची संधी मला मिळाली. मायेचा, प्रेमाचा वर्षाव करीत राहणारी प्रचंड गर्दी, ताशे-वाजंत्र्या, हलग्या-तुताऱ्या, ढोल-लेजीमच्या जल्लोषात बैलगाडीतून निघालेली मिरवणूक, सात-आठ तास चाललेला सत्कार सोहळा या सर्वांतून एक गोष्ट प्रत्ययाला येत होती आणि ती म्हणजे त्यांनी कथालेखनामुळे आणि कथाकथनामुळे मिळवलेली अफाट लोकप्रियता. मात्र त्यांनी लोकप्रियता लाभते म्हणून वाचकानुनय करणारी कथा लिहिली नाही. लिहावेसे वाटले म्हणून लिहिणे आणि वाचकांची मागणी पुरी करण्यासाठी लिहिणे यात फरक आहे. ' मी एका बेहोषीत लिहिलं,' ' एका झपाटलेल्या अवस्थेत कथा लिहिली ' असे एखादा लेखक म्हणतो तेव्हा त्याचे हे म्हणणे त्याच्या प्रत्येक कथेच्या संदर्भात सत्य नसते. प्रत्येक लेखकाच्या कथासंपदेत काही मोजक्या कथांचे लेखन झपाटलेल्या अवस्थेत झालेले असते. ' नाटक ' या कथेबाबत प्रा. वा. ल. कुलकर्णी म्हणतात, " ' नाटक ' ही कथा एका खेड्यातील नाट्यप्रयोगाचे अक्षरशः झालेलं नाटक होय. या कथेत रचना कमी आहे. जवळजवळ नाही असे वाटावे असेच तिचे लेखन आहे. जे घडते तेच वास्तव इतक्या गंमतीदार विसंगतीनं भरलेलं आहे,की त्याचे केवळ दर्शन हास्योत्पादक ठरते." ' वळीव ' कथेबद्दल शंकर पाटील सांगतात, " माझे एक लेखकमित्र मला काही वाचून दाखवत होते. मी ऐकत होतो. मध्येच त्यांच्या वाचनात नांगरलेल्या शेताचा उल्लेख आला आणि एकाएकी डोळ्यांपुढे एक कथा उभी राहिली. चित्त लागेना झालं आणि मी त्यांना म्हणालो, " थांबा " ते म्हणाले, " का ? " मी म्हणालो, " मला कथा सुचली... ऐका.' मी त्या क्षणी सगळी कथा त्यांना ऐकवली " किंवा ' भूल ' या कथेबाबत

त्यांनी लिहिलंय,' मी त्यावेळी बारामतीला होतो. माझे वडील बंधू कोल्हापूरला आजारी होते. एक दिवस मला तार आली. बंधू फार आजारी होते आणि मला तातडीनं बोलावलं होतं. मी एकदम गांगरून गेलो. मिळेल त्या गाडीनं मी जायचं ठरवलं, गाडीत बसलो. मन अगदी बेचैन झालं होतं. ही बेचैन सैरभैर अवस्था मी कधीही विसरणार नाही. बारा तासांच्या प्रवासात मला ' भूल ' ही कथा सुचली.'' ही दोन्ही उदाहरणे एवढ्याकरिता दिली की कथा कशी सुचेल याला नियम नाही. आणखी एक असे की पाटील कथा लिहितात म्हणजे त्या स्वतःला तरी सांगतात किंवा दुसऱ्याला ऐकवतात. एका मुलाखतीत त्यांनी म्हटले होते की मी लिहिताना मोठ्याने बोलत असतो. त्याचा एक परिणाम म्हणजे त्यांच्या कथांचे निवेदन मोठे प्रवाही आणि प्रभावी असते.त्यांची कथा वाचीत असताना वाचकाला सतत वाटत असते की हा प्रसंग आपल्यासमोर उलगडतोय. ' धिंड ' या कथेतील राऊची गावातून निघालेली धिंड, लेजीम-हालगीची झुंज त्यामुळे अंगात भरलेली लय इत्यादी अगदी डोळ्यांसमोर घडत राहते आणि ' डांग टिक् टाक् टिक् डांग टिक् टाक् ' हे बोल कथा संपली तरी घुमत राहतात. पाटलांची कथा मोठ्यानं स्वतःशी वाचण्यात फार आनंद वाटतो आणि पाटलांच्या तोंडून ऐकताना तर वाचक स्वतःला पार विसरून जातात. ही रंगत फार थोड्या कथालेखकांना साधता येते.

किंबहुना पाटलांच्या कथेचे सौंदर्य त्यांच्या निवेदनरीतीत आहे. ' ऊन ' कथेचा आरंभच पहा ना—

कर्रकुर्र कर्रकुर्र कावडीचा आवाज करीत रामू दारात आला. सोप्याला पोराचं रडणं ऐकून जरा थबकल्यागत उभा राहिला. आणि मग तसाच कावड घेऊन आत गेला. खांद्यावरची कावड उतरून त्यानं खाली ठेवली आणि घागरी न सोडताच तो वहिनीला म्हणाला, ''शिवन्या का रडाय लागलाय— ''

'' आता खेळत हुता चांगला.''

'' पर आता रडाय लागलाय न्हवं ? ऐकू ईना ? ''

'' येतंय की ! '' असं म्हणून त्याची वहिनी म्हणाली, '' पोरच हाय ते. घटकंत रडायचं, घटकंत खेळायचं.''

निवेदन प्रवाही तर आहेच. पण पाटील वळसे घेत घेत कथेचं निवेदन करीत नाहीत. ते एकदम कथेच्या प्रवाहापाशी वाचकांना घेऊन येतात.नाट्यात्म संवादाची योजना करण्याचे कसबही पाहण्यासारखे आहे. त्यांच्या निवेदनात जी लय जाणवत राहते त्यामुळे कथेचा पट व्यवस्थित मांडला जातो. ' वेणा ' या कथेचा ' आरंभ ' ही पाहण्यासारखा आहे. ते लिहितात—

हातकलंगड्याचा बाजार करून चांभाराची भागू गावाकडे निघाली होती. वाटेला सोबतही कुणाची नव्हती. गाव अजून तीन मैल लांब राहिलं होतं आणि भागाला तर पाऊल उचलत नव्हतं. मध्येच पोटात दुखायला लागलं होतं. माकड हाडाजवळनं कळा सुटून खाली मांड्यात उतरत होत्या.

अगदी एकदोन वाक्यानंतर ते 'भागू'च्या अवस्थेची जाणीव करून देतात आणि वर्णनातला बारकावा तिच्या अस्वस्थतेवर प्रकाश टाकतो. वेध, खेळं, गावातल्या पाटर्या आदी काही पात्रमुखी किंवा प्रथमपुरुषी निवेदनरीतीचा अवलंब केलेल्या कथांचा अपवाद वगळता शंकर पाटलांना ' त्याचं असं झालं... असं असं घडलं ' या जातीची परस्मैपदी निवेदनरीती प्रिय आहे. म्हणून आपल्या फर्मास निवेदनरीतीनं वाचकांच्या चित्ताचा ठाव घेणाऱ्या पाटलांची कथा 'लांबी-रुंदी-खोली' अशा तिन्ही परिमाणांनी युक्त आहे.

स्फुट गोष्ट, संपूर्ण गोष्ट, लघुकथा अशा विविध अवस्थांतून वाटचाल करणाऱ्या मराठी कथेला कथानक व व्यक्तिचित्रण अशा दोन परिमाणांचे भान होते. पण ' व्यक्तिमनाचे दर्शन ' हे तिसरे परिमाण नवकथेच्या आगमनापासून लाभले.एखाद्या व्यक्तिमनाचा शोध वेगवेगळ्या भूमिकातून आणि वेगवेगळ्या पातळ्यांवरून घेता येतो. व्यक्तीचे बाह्यविश्व आणि अंतर्विश्व यामध्ये एक अपरिहार्य नाते आहे आणि तिचे अनुभवविश्व स्वयंपूर्ण आहे, ही फार महत्त्वाची जाणीव महायुद्धोत्तर कथालेखनामागे आहे हे लक्षात घेतले पाहिजे. म्हणून तर पाटलांना वाटते की माणूस, त्याचे बाह्यविश्व, त्याचे अंतर्विश्व त्यांच्यातील परस्परसंबंध, त्यातील गुंतागुंत, त्याच्या कुटुंबातील माणसांची मनं यांचा शोध खोलवर जाऊन घ्यावा. व्यक्तिमनाचे पदर न् पदर उलगडून दाखवण्यात ते रंगून जातात तर कधी माणसाच्या मनातील निरनिराळ्या कारणांनी निर्माण होणाऱ्या ताणतणावांचे ते सहज दर्शन घडवतात. ' व्यक्तिमन ' हाच त्यांच्या चिंतनाचा आणि कुतूहलाचा विषय आहे. ' पाहुणी ' कथेतील रत्नाला गौरामावशीने नुसते सांगितले, 'रत्ना, ह्या आठ रोजात तुझ्या बाला एक जास्त झालंय ' तेव्हा पाटलांनी एकच अर्थपूर्ण वाक्य लिहिलंय. ते लिहितात—

'काळा भोंगा तुळीला लागावा तसं मनाला भोकच पडलं. आतनं सगळं पोखरत चाललंय' रत्नाच्या मनाला अस्वस्थता वाटू लागली, तिच्या वाट्याला आलेले हे ताण कोणते, तिच्या मनात नेमकं काय आलं हे शोधता शोधता कथेला आकार येत गेला. तसं पाहिलं तर वाट पाहण्याचा अनुभव कुणाही प्रियकराला किंवा प्रेयसीला येतो- प्रतीक्षा ही कथा 'वाट पाहण्या' भवती आहे. सकाळी गाढ झोपल्यावर केव्हाही मध्यानराती उठून येणारी प्रेयसी कधा येईल त्याची चिंता करीत उभा राहणारा शिवराम तसा मनातून भ्यायलेला आहे. रात्र जसजशी वाढत जाते तसतसे त्याला वाटत राहते,की हिकडे ही आली आणि जर वड्यावर मोटार तयार नसली तर जायचं कसं? म्हणजे आपला मित्र अकबर वड्यावर मोटार तयार ठेवून केव्हा येतो त्याची वाट पाहणे आलेच. तुकाराम तर त्याला अधिकच भयभीत करीत होता. तो म्हणत होता, 'असं पळून जाताना तावडीत गावला तर तुम्हा दोघासनीबी जित्तं पुरंल तिचा बाप' त्याचा दुसरा दोस्त तुकाराम म्हणजे आडामोडा घालणारे एक मनच आहे. पाटील फार जाणीवपूर्वक कथा गुंफीत नाहीत. एकेक धागा घेत घेत त्याचा गोफ बनून जातो. त्यांच्या अनेक कथा वाचताना हाच अनुभव येतो. तुकाराम, शिवराम आणि अकबर यांच्या संभाषणातून शिवरामचे भेदरलेले मन जाणवते. पाटील लिहितात– अकबर खोलीतल्या खोलीत येरझारा घालत होता. तुकाराम जीव मुठीत घेऊन उभा होता. कात्रीत सापडलेला शिवराम आपल्या अवघडलेल्या पायांची थोडी हालचाल करून म्हणाला, "ती आली नाही तर देवानं बघून घेतलं असं होईल" काळजी करता करता पहाट फुटली की तुकाराम व अकबर झोपून राहतात आणि घोरत राहतात; पण शिवरामच्या मनात काळज्या, शंकाकुशंका नुसत्या थैमान घालतात. सूर्याचे किरण शिवरामच्या डोळ्यात भाल्यासारखे घुसतात आणि त्याच्या मनात एवढेच येते–'मला घोर पडलाय तिचा. तुकाराम, काय बरं-वाईट तर झालं नसंल तर नव्हं तिचं? अकबर, अरं बोला की रं!' शिवरामची काकुळतीला आलेली केविलवाणी मूर्ती अगदी ठसठशीतपणे उभी राहते. तसे रूढ अर्थाने या कथेला कथानक नाही. वाट पाहात राहणाऱ्या शिवरामच्या अस्वस्थ बेचैन मनाचे दर्शन घडत राहते. कथेचे निवेदन अशा चतुराईने केले आहे की वाटत राहते 'ती येणार, ती येणार' वाट पाहण्याच्या अनुभवातला एकपदरीपणा संपून या अनुभवाचे अनेकपदरीपण जाणवते. ही किमया पाटलांच्या लेखनाची. 'भुजंग' ही कथा वाचली की 'पाटील-टच' लक्षात येतो. चोहो-बाजूंनी कोंडीत सापडलेल्या जनाईचं बावरलेलं मन पाटील अशा तऱ्हेनं चित्रित करतात की, वाचक जनाईच्या अंतर्विश्वात पार समरस पावतो. खुळ्यागत नवरा नशिबी आला तरी प्रपंचाचा गाडा जनाई ओढीत होती. शेंगाच्या वावरात रों रों रों असा आवाज करीत भुजंगाने जनाईला पहिले दर्शन दिले आणि तिच्या तोंडचे पाणीच पळाले. बसेल तिथे बसेल आणि पडेल तिथे पडेल असा नवरा भेटलेला आणि चार पोरं देवानं पदरात बांधलेली. तशात तिची भुजंगानं पाठ धरली आहे. ती रानाकडं बघत भुजंगालाच साकडं घालते आणि म्हणते, "बाबा, लई जीव वैतागलाय माझा. वस्तीला हैस आमच्या. लई न्हाई, थोडी तरी तुला कळकळ याय पाहिजे. कुनाचं पाठबळ हाय का सांग बघू आम्हाला?" आणि अखेरीस तर ती त्याला आव्हानच देते आणि म्हणते, 'जल्माचं गानं झालंय माझ्या. ऐकलंस?' तिचा 'का एवढं वघाय लागलायस रं?' हा तिचा उद्‌गार तिच्या मनात उफाळून आलेल्या संतापाचा निदर्शक आहे. पाटलांना ताण सोशीत राहणाऱ्या स्त्री-पुरुषांविषयी विलक्षण कुतूहल वाटतं. जनाई भुजंगाशी निर्वाणीचं भाषण करते आणि 'कड लावल्याशिवाय मी काय हितनं हालनार न्हाई बघ' या वाक्यातील निर्धारासरशी ती सोसत राहिलेला ताण नाहीसा होतो आणि आल्या परिस्थितीला धैर्यानं आणि ठामपणे तोंड देणाऱ्या जनाईचे व्यक्तिमत्व उजळून जाते.

'भुजंग' मधील जनाईच्या मनातली विविध आंदोलने चित्रित करताना 'व्यक्तीची भावस्थिती' वाचकाला जाणवत राहते आणि मग त्यांची व्यक्तिदर्शन करणारी कथा 'कुटुंब कथा' बनून जाते. नागरी वातावरणातली असोत की ग्रामीण वातावरणातील असोत मराठी कथेत 'कुटुंबे'च असतात. या कुटुंबाचे चित्रण त्या त्या कथालेखकाच्या प्रकृतीधर्मानुसार ( sensibility ) होत राहते. संकुचित, क्षुद्र जीवनात जगणारी किंवा जगत मरणारी तीन मुलांची आई 'भागलेला चांदोबा' या कथेत गंगाधर गाडगीळांनी कुतूहलविषय केलेली असली तरी ती एका कुटुंबाचीच कथा आहे. मराठी माणसाच्या

जीवनपद्धतीत ‘कुटुंबरचनेला’ फार महत्त्वाचे स्थान आहे. विभक्त असो की एकत्र कुटुंब असो अखेर ते ‘कुटुंब’ च. ‘सुरस आणि चमत्कारिक’ या कथेत गाडगीळ मध्यमवर्गीय कुटुंबाच्या संदर्भात जे लिहितात ते जवळ जवळ सर्व मराठी कुटुंबाच्या जीवनरीतीचे वर्णन करू शकेल. ते लिहितात, ‘हातांनी कष्ट करायचे आणि पोटाची खळगी भरायची; स्त्रीला भोगायचे आणि वंश वाढवायचा, द्वेषात होरपळायचे आणि प्रेमाच्या नाजूक, चटकन तुटणाऱ्या धाग्याला धरून त्यातून बाहेर पडण्याकरता धडपडायचे, उद्या खोटा ठरणारा अनुभव साठवायचा आणि वाशी स्वप्ने हृदयाशी कवटाळायची आणि अखेर मातीत मिळून जायचे” एक प्रकारचे दिशाहीन, क्रियाशून्य भविष्यहीन, पराक्रमशून्य जीवन ज्यांच्या वाट्याला आलेले आहे अशी मराठी माणसांची कुटुंबे आहेत आणि या कुटुंबात स्त्री म्हणजे उपभोग्य वस्तू, शोभेची वस्तू ! तिचे या कुटुंबात नेमके स्थान काय ? त्याचे उत्तर मराठी कथेत तरी सापडत नाही.

शंकररावांच्या बहुसंख्य कथांतून स्त्रीचे दुःख व्यक्त होते. प्रा. वा. ल. कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणे ती माता आहे, कारभारीण आहे, सासुरवाशीण आहे, भावजय आहे, नणंद आहे, वहीण आहे आणि याखेरीज आणखी कितीतरी नात्यांनी ती आपल्या डोळ्यांसमोर येत आहे. तिचे जगणे कुटुंबाकरता आहे, स्वतःकरता नाही. कुटुंब हेच तिचे सर्वस्व. जे वाट्याला आले ते निमूटपणे सोसावे, काहीही होवो काबाडकष्ट करीत राहावे, नवरा मुले इत्यादींसाठी झिजत मरावे हेच मराठी माणसाच्या कुटुंबातील स्त्रीचे जिणे ! जगण्यासाठी तिने श्रद्धा स्वीकारल्या आहेत आणि निष्ठाही जोपासल्या आहेत. आपल्या अवतीभवती वावरत असलेली स्त्री, तिचे भावविश्व, तिच्या वाट्याला आलेली दुःखे, तिच्यावर कोसळत असलेल्या आपत्ती पाटलांना समजून घ्यायच्या आहेत. ‘पाहुणी’ कथेतील रत्नाच्या मनाला काळा भोंगा तुळीला लागावा तसा पोखरतो आहे. कारण तिला वाटते आहे, आपल्या माहेरच्या घराला काय कळा आलीय हो ! कसं होतं आणि कसं झालं. नाती राहिली नाहीत, गोती राहिली नाहीत. कसली रीतभातही राहिली नाही” मृत्युपंथाला लागलेल्या बापाची आबाळ झालेली पाहून तिला भडभडून येतं. पण भावजयीची सत्ता जिथे चालते तिथे आपली स्थिती परकेपणाचीच आहे हे लक्षात येऊन दुःख सोसण्याशिवाय तिच्या हाती दुसरं काही राहात नाही. ‘मागणी’ या कथेतील जनाई तापामुळं अत्यवस्थ असलेल्या म्हाद्यासाठी देवाची करुणा भाकते आणि म्हणते, “देवा, ह्या टीचभर रानात मी एकटी राबले. तांदूळ निवडावा तसा ह्या शेतातला खडान् खडा मी वेचलाय. एवढा मी घाम गाळला म्हणून हे पीक आलंय. आता एकच मागणं हाय...एवढी ह्याची कापणी–मळणी करते. एक ऊन भाकरी करून माझ्या पोराला वाढू द्या. तेवढी त्याच्या पोटात पडली म्हणजे मग त्याला खुशाल घेऊन जा” देवाला साकडं घालणाऱ्या या निराधार आईला फक्त कष्ट आणि कष्टच करावे लागतात. ग्रामीण कुटुंबाची गोष्ट जरी पाटील सांगत असले तरी ती कोणत्याही कुटुंबात घडू शकेल अशीच गोष्ट आहे. कारण आमच्या कुटुंब-व्यवस्थेत स्त्रीला काही मन आहे, ती माणूस आहे असं कुणी मान्य केलेले दिसत नाही. कुटुंबाचे स्वास्थ्य वैवाहिक नात्यावर अवलंबून असते. पण पति-पत्नीत समान नाते असण्याऐवजी ‘धनी-दास’ असेच नाते अस्तित्वात आहे. ते ‘कुटुंब चित्र’ मराठी कथेत प्रामुख्याने येत गेले. आयुष्यभर एकमेकाला साथ देणारी व एकमेकांच्या सुखदुःखात सहभागी असलेली पति-पत्नी पाटलांच्या कथेत (वळीव) जशी आढळतात तसे आपापल्या बायकांना झोडपून काढणारे बापलेकही आढळतात (बंगण) तर ‘लोडणा’ मधील स्त्री बोलतच नाही. नुसते दुःख सोशीत राहते. आणि नवऱ्याने विहिरीत ढकलून दिल्यानंतर तिची दुःखातून कायमची मुक्तता होते. ‘आहेर’मधील बाळ ईला माहेरी जो अपमान, अवहेलना सोसावी लागते, ती तिने कोणत्या तोंडाने नवऱ्याला सांगावी ? ‘दसरा’मधील काशीबाई म्हणते, “सहा महिने माझा दाल्ला झिजाय लागलाय, सगळीकडनं असं खुटल्यागत झालंय, हातपाय हालवायला काही वाव राहिला नाही, म्हणून नाविलाज होऊन आज मला भावाच्या दारात यायची पाळी आली.” ‘सारवण’मधील हिरा तर दुःख विनतक्रार भोगल्याशिवाय काहीच करू शकत नाही. ती म्हणते, “कुणाऽऽला सांगायचं नाही, काऽय नाही. आपलं आपण सोसायचं, आतल्या आत गिळायचं आणि होतंय तोवर करायचं, खुटलं की गप्प बसायचं” एका अर्थाने स्त्रीची असहाय्यता, अगतिकता या वाक्यातून व्यक्त होते.

केवळ स्त्रीलाच दुःख भोगावं लागतं असं नाही पण तिच्या वाट्याला आलेल्या दुःखाच्या तुलनेत पुरुषांना सोसावी लागणारी दुःखं कमी तीव्र आहेत आणि त्यांचे स्वरूपही वेगळे आहे. पुरुषांना सोसाव्या लागणाऱ्या दुःखाचे मूळ त्यांच्या अडाणीपणात, आर्थिक ओढग्रस्तीत आणि गतानुगतिकतेत आहे. स्त्रीच्या वाट्याला जी दुःखे येतात त्यांचे मूळ शोषणप्रधान विषमतेवर असलेल्या सामाजिक व्यवस्थेत, कुटुंब-रचनेत आहे. कुटुंबात तर सर्व सत्ता पुरुषाच्या हातात आहे. येथे ग्रामीण वा नागरी असा भेद नाही. अशा कुटुंबात स्त्रीला निर्णय स्वातंत्र्य नाही किंवा निर्णय प्रक्रियेत सहभागी होता येत नाही. तुला काय समजतंय? मी म्हणतो तसंच झालं पाहिजे, बायकांची अक्कल चुलीपाशी इत्यादी मुक्ताफळे कुटुंब जीवनात नित्य उधळली जातात याचा अर्थच असा की, अनेक नात्यांनी कुटुंबात वावरणारी, कुटुंबासाठी झिजत राहणारी स्त्री परतंत्र आहे.

आमच्या खेड्यापाड्यात शेतीव्यवसाय प्रमुख. अनेक अन्य व्यवसाय 'शेती'शी जोडलेले, जखडलेले. गावगाड्याची रचना कृषिकेन्द्रितच शेतीचा शोध हा कुटुंबाच्या जडण घडणीस कारण ठरला आहे हे तर खरेच. गावगाड्यातील आर्थिक संबंध शेतीवरच आधारलेले आहेत. वाढते तंत्रज्ञान, झपाट्याने होणारे औद्योगीकरण यांमुळे कुटुंबव्यवस्थेवर फार मोठे आघात झालेले आहेत. पण शहरात जितक्या झपाट्याने कौटुंबिकसंबंध उलटे पालटे झाले आहेत तितकी उलथापालथ ग्रामीण भागातील कुटुंबव्यवस्थेत झालेली नाही. ग्रामीण भागातील कुटुंबव्यवस्थेला हादरे बसले आहेत. पाटलांचे संवेदनाशील मन या कौटुंबिक संबंधाचा वेगवेगळ्या पातळीवर शोध घेत आहे. कधी त्यांना कुटुंबातील रक्ताच्या व धर्माच्या नात्याचा तकलादूपणा जाणवतो तर या नात्यातील चिवटपणाचे दर्शनही घडते. कधी ही कुटुंबे वेगवेगळ्या तणावांनी धुमसत असतात तर कधी एखाद्या व्यक्तीच्या स्वार्थी स्वभावामुळे कुटुंब उन्मळून जाते. कौटुंबिक नात्यामागील सामाजिक, आर्थिक कारणांचे भान त्यांना आहे. ते कुटुंबात निर्माण होणारे ताण-तणाव चित्रित करतात. कुटुंबातील स्त्री-पुरुषांना जी दुःखे भोगावी लागतात त्यांचा वेध घेणे हे कथेचे अवतार कार्य म्हणून मानता येईल. 'आहेर' या कथेतील बाळाईच्या सगळ्या बहिणींना चांगली चांगली लुगडी नेसवली बाळाईला मात्र लुगडे नेसवले नाही. तिची कुणाला आठवणच झाली नाही. दारिद्र्य अपरिहार्यपणे अपमानित झालं, एवढंच. भावाचा निरोप घेऊन निघालेल्या बाळाईला भाऊ घेतलेल्या कर्जाऊ रकमेची आठवण करून द्यायला विसरत नाही आणि तो म्हणतो, "जा बाई, लग्नात लई खर्च झाला म्हणून तुला आहेर करायचा राह्यलाय. जरा आवराआवर झाली मंजे एक चोळी तेवढी पोस्टातनं लावून दीन तुला... जा आता" भावाने जणू दरिद्री बहिणीच्या फाडफाड मुस्कटात भडकावून तिची मायाच लाथाडून टाकली होती. गावगाड्यातील जातिसंबंध हेही सामाजिक ताण-तणावांच्या मुळाशी आहेत. पण त्याचा वेध पाटलांनी फारसा घेतलेला नाही.

स्त्री–पुरुषांच्या दुःखाचा वेध घेणारी कथा पाटलांनी लिहिली. तसे पाहिले तर दुःखाचा शोध घ्यावा हा ललित लेखकाचा एक सनातन धर्म आहे. प्रत्येक जातिवंत लेखक आपल्या कुवतीनुसार दुःखशोध घेत असतो. पाटलांनी हा शोध चिंतनशील वृत्तीने घेतला आहे. जणू त्यांची कथा चिंतनाच्या डोहातून उमटलेली असते. 'ऊन' मधील रामूला वाटते– 'ऊन वरनं असाच चटका देत राहावं, ज्याला खाली उतराव्यात, पायाखाली अलव्यातली खाई पेटावी आणि डोळे झाकून चालत राहावं... कुठं थांबू ने सवरू ने, कुठे विसावा घेऊ ने, पाणी पिऊ ने' पाटलांच्या कथेतील स्त्री–पुरुषांची दुःखे अशीच त्यांना घेरून टाकणारी– या दुःखाची ओझी वाहात हे स्त्री–पुरुष जगत आहेत– जळत जळत जगत आहेत. पाटील तटस्थपणे म्हणत असावेत– या दुःखांना आदी आहे पण अंत नाही.

□ □

## साभार स्वीकार

### नाटके–एकांकिका

**हॅम्लेट** : नाना जोग; मौज प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. २० △ **मुक्ता**; जयवंत दळवी; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं.; १९८५; रु. २० △ **दार कुणी उघडत नाही / बस स्टॉप** : सतीश आळेकर; नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ७

# आठवणीतील शंकर पाटील

विजया राजाध्यक्ष

तीस वर्षांपूर्वीचे कोल्हापुरातील दिवस. माझे कॉलेज शिक्षण संपत आले होते. शाळा कॉलेजात असल्यापासून निर्माण झालेले वाचनाचे वेड आता नुसते वेड राहिले नव्हते. त्यात थोडा डोळसपणा येऊ लागला होता. मी अधून मधून लिहूही लागले होते; आणि ते लेखन 'सत्यकथे'सारख्या प्रतिष्ठित वाङ्मयीन नियतकालिकात प्रसिद्ध होण्याचे स्वप्न पाहू लागले होते. या तपशिलात तसे नवे काय आहे? कोणीही आपल्या जडणीघडणीच्या काळाबद्दल जे काही सांगेल तेच हे सगळे आहे. फरक इतकाच की, पुष्कळांच्या बाबतीत, हा जडणीघडणीचा काळ पुढे नीटसा आकारला, त्यातून काही अर्थपूर्ण निष्पन्न झाले असे दिसत नाही. याची विविध कारणे असू शकतात. त्यातील वैयक्तिक कारणे सोडा. पण कोवळ्या मनात फुटलेल्या निर्मितीच्या अंकुराचे पोषण यथायोग्य वातावरणाच्या अभावी न होणे, हे एक महत्त्वाचे कारण असू शकते. हे वातावरण म्हणजे वाङ्मयीन वातावरण. व्यक्तिमत्त्वाचा पूर्णपणे कब्जा घेणारे, वाचन-लेखनाखेरीज इतर सगळे ध्यास नाहीसे करणारे वाङ्मयीन वातावरण. मला ते वातावरण सुदैवाने मिळाले; आणि म्हणूनच तीस वर्षांपूर्वीचे ते दिवस, माझ्या भावी जीवनाच्या संदर्भात अर्थपूर्ण ठरले. हे वातावरण नेमके कोठे होते? त्यावेळी कोल्हापुरात साहित्यिक कार्यक्रम फारसे होत नसत. 'नगरवाचनमंदिर' होते, पण त्यात, मला ज्यात रस निर्माण झाला होता, ते नवसाहित्य नव्हते. फडके–खांडेकरांसारखे साहित्यप्रभू होते, पण त्यांच्या भेटीगाठी विरळ, आणि त्याही बुजरेपणाने घेतलेल्या. कॉलेजात त्याप्रकारचे वातावरण काही प्रमाणात होते; पण त्याला नाही म्हटले तरी प्रासंगिक स्वरूप होते. पण यांपैकी कशाचीच उणीव न भासावी असे वातावरण मला त्या काळातील काही रसिक लेखकांच्या सहवासात मिळाले आणि तेही अगदी माझ्या घरात!

हे लेखक म्हणजे रणजित देसाई, शंकर पाटील, प्रल्हाद वडेर आणि व. ह. पिटके, पुरुषोत्तम पाटील काही काळ कोल्हापुरात होते. त्यावेळी तेही आमच्या या वर्तुळात आले, आणि पुढे त्यात एकजीव होऊन गेले. वडेर माझ्या कॉलेजात होते. त्यामुळे माझी त्यांची तेव्हापासूनची ओळख होती. कदाचित त्यांच्यामुळेच, या मंडळींशी ओळखी झाल्या, आणि त्यांचे स्नेहात कधी रूपांतर झाले. हे समजलेही नाही! पुढे वडेर व पुरुषोत्तम पाटील कोल्हापूर सोडून गेले. व. ह. पिटके खूप दूर राहात. त्यामुळे तेही आमच्या गावाबाहेरच्या घरी वारंवार येऊ शकत नसत, रणजित देसाई व शंकर पाटील मात्र नेहमी येत. आमच्या गप्पा रंगत. संध्याकाळ चटकन संपून जाई, आणि अंधार पडल्यावर ही मंडळी उठत तेव्हा मन प्रसन्न व पुढच्या भेटीसाठी उत्सुक असे. खरेच या भेटीगाठीतून मला किती मिळाले, याचा काही हिशेबच मांडता येणार नाही!

या गप्पात माझी भूमिका अर्थातच श्रोत्याची असे. वडेर, पिटके हे काहीसे अबोल आणि पुरुषोत्तम पाटीलही गप्पिष्ट म्हणावे असे नव्हेत. त्यामुळे या गप्पांचे खरे सूत्रधार दोनच. रणजित देसाई आणि शंकर पाटील! त्यांची जुगलबंदी चालायची. पुरुषोत्तम पाटलांची कविता आणि माझी एखादी हळवी, भावूक कथा हे चेष्टेचे हुकमी विषय! पण ही चेष्टा वरवरचीच. ती कधी संपायची आणि गप्पा इतर वाङ्मयीन विषयाकडे कधी वळायच्या कळायचेही नाही. गप्पात तऱ्हेतऱ्हेचे विषय; त्यासंबंधी चर्चा आणि भैरवी रणजित किंवा पाटील यांच्या एखाद्या कथाकथनाने. त्यावेळी दोघेही फॉर्मात होते. त्यामुळे त्यांच्या पुढे गाजलेल्या अनेक कथा आम्ही प्रथम ऐकल्या. कधी कधी तर त्यांचा कथाबीज सुचण्यापासून ते कागदावर अंतिम स्वरूपात उत्तरेपर्यंतचा प्रवासही पाहिला. निर्मितीप्रक्रियेच्या गूढतेची, अद्भुततेची अनेक अंगे मला तेव्हा-

पासून जाणवू लागली....अशी ही माझी त्या काळाची स्मरणे एकमेकात मिसळलेली आहेत.

पण काही वेळा, तसेच काही निमित्त घडले तर, ही स्मरणे परस्परांपासून अलगही होतात, आणि मग त्या वर्तुळातील एकेका व्यक्तीभोवती ती रुंजी घालू लागतात. अलिकडे तसेच घडले. शंकर पाटील नांदेड येथे भरणाऱ्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष झाल्याचे वाचले आणि मग साहित्यक्षेत्रातील सर्वश्रेष्ठ पदावर विराजमान झालेला हा आपला मित्र त्याच्या उमेदवारीच्या काळात कसा होता, यासंबंधीच्या आठवणी येऊ लागल्या. एकीकडे मन त्याच्या यशाच्या आनंदात मग्न होत असतानाच, दुसरीकडे ते त्याच्या यशाचे विश्लेषणही करू लागले. कुठून कुठे पोचला हा माणूस! या प्रदीर्घ प्रवासात त्याच्याजवळ कोणती शिदोरी होती? सुरूवातीला तर हात रिकामेच होते.पट्टणकोडोली या जन्मगावी पाटलांच्या साहित्यिक पिंडधर्माला मानवेल, असे काय असणार? नेहमीचे शिक्षणही सुरळीतपणे मिळणे अवघड. त्यांच्या वडिलांनी नेट धरल्यामुळे चित्र बदलले, आणि पाटील कोल्हापुरात येऊन दाखल झाले. पण तेथे तरी पाटलांसाठी सगळे तयार होते असे थोडेच आहे? शाळा कॉलेजातील शिक्षणाचे, तेथील अध्यापकांचे काही संस्कार निश्चितच झाले; ते पाटलांमधील लेखकाच्या घडणीला कारणीभूतही ठरले. पण ते अंशतःच. आणखी बरेच काही हवे होते. ते गावातून अन्यत्र मिळाले असे म्हणावे तर तसेही नाही. कारण सुरुवातीला मी ज्या वातावरणाचा उल्लेख केला, तेच वातावरण पाटलांभोवतीही होते; सुसज्ज ग्रंथालय नाही; साहित्यिक कार्यक्रम नाहीत त्या निमित्ताने साहित्यिकांचे येणेजाणे नाही. पण आता असे वाटते की पाटलांना मुळी त्या वातावरणाची गरजच नव्हती. कारण ते त्यांच्या आतच लहरत होते. आत कुठेतरी वाचनाची जबरदस्त ओढ होती; निर्मितीची अनावर प्रेरणा होती. ती पाटलांना घडवत होती. म्हणजेच एका अर्थाने, पाटील स्वतःला घडवत होते. आणि या घडवण्यात महत्त्वाकांक्षेचा भाग बिलकूल नव्हता. आपले व्यक्तिमत्त्व वाचन व लेखन या दोन मार्गांनीच समृद्ध होऊ शकेल हे त्यांना आतून जाणवले होते. आणि त्या समृद्धीच्या प्राप्तीसाठी पाटील एकाग्रपणे पुढे चालले होते.

त्यांचे हे पुढे जाणे मी त्या काळात जवळून पाहिले. जवळजवळ रोज संध्याकाळी पाटील, कधी मित्रांसमवेत तर कधी एकटे, आमच्या घरी येत. केवळ मीच नव्हे तर आमचे सबंध कुटुंबच या मंडळींची वाट पहात असे. कधीकधी रोज येणाऱ्या माणसांचा थोडा कंटाळा येतो— ती माणसे आपल्याला कितीही आवडणारी असली तरी कंटाळा येतो. गप्पांचे विषय कमी होतात, किंवा संपतात. पाटलांबाबत उलट झाले. त्यांच्यामुळे आमची संध्याकाळ अधिकाधिक रंगू लागली. याचे एक कारण म्हणजे पाटलांचे प्रसन्न, दिलखुलास व्यक्तिमत्त्व. त्याला औपचारिकतेचा वासही नाही. त्या वेळी आम्हा सर्वांचेच काही कौटुंबिक, काही वैयक्तिक प्रश्न होते. पण आम्ही त्यांच्याबद्दल कधी बोलल्याचे आठवत नाही. पण त्यासंबंधी न बोलताही त्यांचे दडपण कमी व्हावे, त्यामुळे येणारे औदासिन्य निवळावे असे वातावरण पाटील निर्माण करत. तऱ्हेतऱ्हेच्या विषयांवर खुलून बोलत. पण त्या बोलण्याचा मुख्य भर मात्र साहित्यावरच! सगळे पुस्तक या केंद्राभोवती फिरणारे.

पाटलांनी खूप वाचले होते— आणि ते वाचतच होते. तेव्हा न पडलेला प्रश्न मला आज पडतो आहे. पाटलांमध्ये वाचनाची ही जबरदस्त ओढ कशी काय निर्माण झाली? आणि त्यांनी इतकी पुस्तके कुठून मिळवली? पण हे प्रश्न व्यर्थ आहेत. ज्याला वाचायचे असते, त्याला पुस्तके आपणहून भेटत असतात. पाटलांना खूप पुस्तके भेटली— आणि त्यांनी ती माझ्याही भेटीला आणली. सुरुवात 'सत्यकथे'च्या किंवा 'मौजे'च्या ताज्या अंकापासून व्हायची. आम्ही गावाबाहेर राहात असू. त्यामुळे गावात खेपा घालून ते अंक आणण्याचे काम पाटील उत्साहाने करत. मग त्या अंकातील मजकुराबद्दल चर्चा. आवडलेली एखादी कथा,एखादी कविता...पाटील त्यांच्याबद्दल उत्कटतेने बोलत.कथा-कवितेच्या वैभवाचे ते दिवस होते. त्यामुळे उत्कटतेने बोलण्याजोगे खूपच असे. या वाचनातूनच काही नावे मनात ठसली आणि त्या लेखकांचे संग्रह प्रसिद्ध झाले, तेव्हा त्यांची देवाणघेवाण होऊ लागली. करंदीकर, पाडगावकर, इंदिराबाई यांच्या कित्येक कवितांवर त्या वेळी जीव ओवाळून टाकला. मर्ढेकरांची कविता तर मनात नेहमीच असायची. आज हे आठवताना दोनतीन गोष्टी नव्याने जाणवतात. त्यातील एक म्हणजे पाटलांची रसिक, विश्लेषक बुद्धी. ते उत्तम समीक्षा लिहू शकले असते. पण त्यांनी समीक्षा लिहिली नसली तरी त्यांच्या निर्मिती व्यापारात त्यांना

समीक्षा बुद्धीने नेहमीच साथ दिली आहे; आपण नेमके काय करत आहोत याचे त्यांना सूक्ष्म भान आहे. त्यामुळेच, आपल्या लेखनाविषयी कुठेही आत्मसमर्थनाचा सूर येऊ न देता, पाटील उत्तम भाष्य करू शकतात ! ही गोष्ट त्यांनी उमेदवारीच्या काळापासूनच कमावलेली आहे. आज जाणवणारी दुसरी गोष्ट म्हणजे पाटलांचा काव्यात्म पिंड. ते 'ग्रामीण' लिहीत होते. त्या स्वरूपाच्या इंग्रजी-मराठी साहित्याशी त्यांचे लागेबांधे होते– पण त्यांच्या वाचनात नागर, काव्यात्म साहित्यच अधिक होते ! कवितेची त्यांना विशेष आवड.पाटलांच्या ग्रामीण कथेत दिसणारी निसर्गविषयक भान, जीवनाची शोकात्म जाणीव, प्रतिकात्मकता, लयगर्भ भाषा ही वैशिष्ट्ये त्यांच्या या वाङ्मयाभिरूचीशी संबंधित आहेत, असे मला वाटते. पाटलांची ग्रामीण कथा ही ' नवकथा ' वाटते, ती त्यामुळेच ! आणखी एक गोष्ट म्हणजे त्यांचे निखळ, निर्मळ कुतूहल. त्यावेळी आम्ही सगळेच साहित्याच्या मुख्य प्रवाहापासून दूर होतो. कधीतरी वडेर मुंबईला जाऊन येत आणि तेथील साहित्याच्या जगात काय चालले आहे हे सांगत. कधीतरी श्री. पु. भागवतांचे पत्र येई; त्यात काही वातमी असे. आम्ही त्या अनुषंगाने बोलत असू. पण त्यात कुठे 'गॉसिप'चा लवलेशही नसे. पुढे पाटील मोठे झाले; मुख्य प्रवाहात मिसळले त्यांच्याभोवतीचा साहित्याच्या व्यावहारिक अंगांचा गुंता वाढला. पण ते कोणत्याही भोवऱ्यात सापडले नाहीत, स्वतः अविचल राहून भोवती फिरणाऱ्या जगाकडे अलिप्ततेनेच पाहू शकले, याचे कारण कोठे तरी या निर्मळ कुतूहलात असावे. त्यामुळेच त्यांच्या साहित्याच्या एकाग्र साधनेत कोणीही काहीही व्यत्यय आणू शकत नाही. आणखी एक : पुढे विस्तारलेल्या जगात वावरत असतानाही त्यांनी आपल्या पूर्वजीवनाचे ' नंदनवन ' मनात सांभाळले. ती निरोगी, कसदार मुळे नेहमीच पाटलांच्या आयुष्याचा वेलविस्तार वाढवत राहिली.

पाटलांच्या इंग्रजी वाचनाबद्दलही सांगितले पाहिजे. त्यांच्या बोलण्यात फ्लॅहार्टी, फॉकनर, स्टाईनबेक, हेमिंग्वे या श्रेष्ठ लेखकांचे उल्लेख नेहमी येत. यात प्रदर्शनवादाचा भाग अजिबात नव्हता. इंग्रजी वाचणे म्हणजे काही तरी जगावेगळे करणे हा आवही नव्हता. किंबहुना त्यांच्या मनात मराठी-इंग्रजी हा भेदच अस्तित्वात नव्हता. ते वाङ्मय या दृष्टीने पाहात होते– त्या वाङ्मयाच्या भाषा वेगळ्या इतकेच ! पण या इंग्रजी वाचनानेच पाटलांचे अधिक पोषण केले असावे. हे पाश्चात्त्य लेखक पाटलांच्या प्रकृतीशी जुळणारे होते. पाटलांमधील घडणाऱ्या लेखकाला त्यांनी अनेक नव्या वाटा दाखविल्या असल्या पाहिजेत. या लेखकांपर्यंत पाटील पोचले याचे श्रेय त्यांच्याइतकेच त्यांच्या वाचनप्रेमी स्नेह्यांनाही दिले पाहिजे. आपल्या मोहन जायदे या मित्राचा पाटील या संदर्भात अगत्याने उल्लेख करतात हे येथे आठवते. या श्रेयाचे आणखी एक वाटेकरी म्हणजे ' सत्यकथे 'चे संपादक श्री. पु. भागवत. त्यांच्यामुळेही पाटलांना नवे वाचण्याची प्रेरणा त्या काळात मिळाली; आणि त्यामुळे पाटलांच्याच शब्दात, त्यांची ' कलादृष्टी ' प्रगल्भ झाली. फॉकनर, स्टाइनबेक आदि लेखक पाटलांना आवडणे हे साहजिकच होते. पण सार्त्रसारख्या लेखकांवर पाटलांचे प्रेम जडण्याचे तसे काय कारण होते ? सार्त्रच्या ' इंटीमसी ' सारख्या कथासंग्रहाबद्दल पाटील किती भारावून जाऊन बोलत, हे मला आजही आठवते आहे ! पाटलांचा त्यावेळचा आणखी एक फार आवडता लेखक म्हणजे आल्बर्तो मोराविया. त्याची ' बिटर हनिमून ' ही कथा पाटलांनी मला जवळ जवळ पाठ असल्यासारखी सांगितली होती. पाटलांच्या वळणाशी न जुळणाऱ्या या वाचनानेही त्यांना पुष्कळ काही दिले आहे, असे मला वाटते. त्या लेखनातील समृद्ध जीवनविषयक जाणीव पाटलांच्या लेखनातही उतरली आहे. अनुभवाला, त्यातील सगळ्या तपशिलांसकट सामोरे जाण्यामधील धीटपणा त्यात उपजत होताच, पण या प्रकारच्या वाचनामुळे तो विकसित झाला. या दृष्टीने मला ' बिटर हनिमून ' व पाटलांची ' वेणा ' यांच्यात काहीतरी संबंध जाणवतो. ' वेणा 'तील तपशीलही– ' बिटर हनिमून ' मधील तपशिलांप्रमाणेच– त्यातील अर्थपूर्णतेच्या जाणिवेतून आले आहेत–केवळ धीटपणातून नव्हे !

असे हे उमेदवारीच्या काळातील पाटलांभोवतीचे वातावरण आणि त्या काळात त्यांचे चालू असलेले वाचन. पाटील वाचत होते–आणि समांतरपणे लिहीत होते. त्यांनी निवडलेला अध्यापनाचा व्यवसाय या दोघांना पूरक असाच होता. पुढे ते वेगवेगळ्या क्षेत्रात गेले. त्या क्षेत्रांचे रूपरंग वेगळे होते–अधिक आकर्षक, झगझगीतही होते. पण पुढेही पाटलांनी लेखनवाचनाला दिलेला अग्रक्रम बदलला नाही. आम्ही भेटत होतो तो

तर पाटलांच्या कथालेखनाच्या बहराचा काळ ! त्यांच्या अनेक उत्तमोत्तम कथा तेव्हा लिहिल्या जात होत्या त्या लेखनाचा वेग थक्क करणारा होता. पाटील त्या सुचण्याच्या व लिहिण्याच्या नशेत असायचे. जवळजवळ दिवसाआड एक कथा ! एक कथा लिहिली जात असताना त्यांच्या मनात निदान आणखी एक कथा घोळत असायची व ती समांतरपणे तयार होत असायची. एकीकडे ती कथा आम्हाला सांगणे, आणि दुसरीकडे लिहून झालेली कथा वाचून दाखवणे हे चक्र, सातत्याने चालू असायचे. कथालेखन दोन टप्प्यांमध्ये : प्रथम 'रफ्' आणि नंतर 'फेअर' पक्का खर्डा काही वेळा खूप बदललेला असायचा. याचाच अर्थ, या लेखनामागे विचार होता; केवळ स्फूर्तीवर विसंबण्याचा भावडेपणा नव्हता. पाटलांची शुभ्र, पातळ, पिन आखलेल्या कागदावरील 'फेअर' कथा मला अजून आठवते. मध्यम आकाराचे वळणदार अक्षर, गडद शाई, लिहितालिहिता तिरप्या झालेल्या ओळी मग ती कथा 'सत्यकथे'कडे रवाना व्हायची. तिच्या निमित्ताने झालेल्या पत्रव्यवहाराचीही चर्चा व्हायची (आम्हाला श्री. पु. भागवतांची पत्रे ही पर्वणी वाटे. आम्ही त्यांचे सामुदायिक वाचन करत असू.) हे नंतरचे. आधीचे कथा सांगणे हेही तितकेच आनंददायक असायचे. पाटील कथा खुलवून सांगत. सांगता सांगता त्यांना खूप सुचे. या अर्थाने, 'सांगणे' ही त्यांच्या निर्मितीप्रक्रियेतील एक गरजेची गोष्टही होती. पाटलांचे निवेदन व 'कथन' यांचे खास रंग या एका वस्तुस्थितीतही शोधले पाहिजेत. त्या वेळी हे जाणवले नव्हते. जाणवणे शक्यही नव्हते. पण त्या वेळी ऐकता ऐकता जे जाणवायचे, त्याबद्दल मोकळेपणाने चर्चा व्हायची, पाटलांना ही चर्चा हवी असायची. प्रतिकूल मतप्रदर्शनामुळे ते कधी दुखावल्याचे, चिडल्याचे आठवत नाही. त्या बाबतीत त्यांची दृष्टी स्वागतशील, अनाग्रही, मोकळी होती.

आमच्या या नित्याच्या भेटीगाठी, चर्चा चालू असताना आमचे एखादे वाङ्मयीन दैवत कोल्हापुरात दाखल व्हायचे. त्यामुळे येणाऱ्या उत्साहाच्या उधाणाला तोडच नव्हती ! श्री. पु. भागवत दोनतीनदा आले. ते पत्रव्यवहारामुळे, दूर असूनही जवळ आलेले. त्यांनाही नव्या लेखकांबद्दल अगत्य. त्यामुळे ते असताना व येऊन गेल्यानंतर आम्हाला फार उल्हसित वाटायचे. एकदा श्री. ना. पेंडसे आले होते. त्यांच्या 'यशोदा'या कादंबरीचे वाचन त्यांनी आमच्या माधव ताम्हणकर या साहित्यप्रेमी मित्राच्या घरी केलेले आठवते. पेंडशांसारखा मोठा लेखक त्याची अप्रसिद्ध कादंबरी आम्हाला वाचून दाखवणार या कल्पनेनेच आम्ही थरारलो होतो ! अशा भेटी–गाठींच्या वेळी पाटील आत्मविश्वासाने, विनयाने वागत. संभाषणात, चर्चात रंग भरत. ते व रणजित असले की इतर कोणाला फारसे काही बोलावेच लागत नसे !

असे ते मंतरलेले दिवस, कसे झर्रकन निघून गेले ते समजलेही नाही. पुढे आम्ही या ना त्या कारणाने पांगलो. पाटील नोकरीनिमित्त बारामतीला गेले. कोल्हापूरला त्यांचे घर असल्यामुळे त्यांच्या खेपा होत व दर खेपेत एखादी तरी फेरी ते आमच्या घरी टाकत. शिवाय आमचा पत्रव्यवहारही होता. माझ्या लग्नामुळे झालेल्या स्थलांतरात ती पत्रे कोठे हरवली कोण जाणे ! आता वाटते की ती पत्रे सांभाळायला हवी होती. कारण पाटलांचे पत्रलेखनही सुंदर, शैलीदार असायचे. त्यात अनेक वाङ्मयीन बाबी असायच्या. मुद्दाम 'वाङ्मयीन पत्र' लिहिणे वगैरे नाही. पण आमचे सगळे आयुष्यच जिथे वाङ्मयमय झाले होते, तेथे आम्ही लिहिणार तरी दुसऱ्या कोणत्या विषयावर ? नवकवितेच्या व नवकथेच्या काळात घडणाऱ्या एका गुणी लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा सहजस्फूर्त अविष्कार पाटलांच्या त्या पत्रात होता.

पुढे पत्रव्यवहार थांबला. भेटीगाठीही विरळ झाल्या. जो तो आपल्या व्यापात गुंतल्यावर हे होणारच. त्यामुळे या दुराव्याबद्दल आमच्यापैकी कोणाच्याच मनात खंत नाही. ही खंत नसण्याचे खरे कारण म्हणजे आम्ही मनाने दुरावलो नसल्याचा विश्वास ! त्या मंतरलेल्या दिवसांच्या चिवट मजबूत धाग्याने आम्हाला कायमचे बांधून ठेवले आहे. त्यामुळे आम्ही दुरूनही एकमेकांचा माग घेत असतो. एकमेकांच्या व्यथांनी व्यथित होतो, सुखांनी सुखावतो; त्याबद्दल प्रत्यक्ष न बोलता लिहिताही, मानसिक आधार मिळत राहतो.

नंतरच्या काळात, जरा दुरूनच मी पाटलांचा उत्कर्ष पाहिला आणि त्यामुळे आनंदित झाले. त्यांना मिळालेल्या प्रत्येक मानसन्मानाबद्दल वाचले की माझ्या मनात जुन्या आठवणींची गर्दी उसळते, आणि मला प्रश्न पडतो, आयुष्याच्या इतक्या पुढच्या, यशस्वी टप्प्यावर त्यांना हा उमेदवारीचा काळ आठवत असेल का ? पण कधी

पाटील भेटले की कळते, हा प्रश्न व्यर्थ आहे, कारण त्यांच्या संभाषणात या जुन्या आठवणींनाच प्राधान्य असते. त्या भूतकाळाला सोबत घेऊनच ते आपल्या वर्तमानकाळाबद्दल बोलत असतात. याचा अर्थ, खंड पडलेला नाही; मागचे मागे, पुढचे पुढे असे झालेले नाही. आणि तसे झालेले नाही म्हणूनच पाटलांचे व्यक्तिमत्त्व आज इतके संपन्न आहे! भूतकाळाचे लहानमोठे झरे त्यांच्या आयुष्याच्या मुख्य प्रवाहाला सहजपणे येऊन मिळाले आहेत, आणि तो प्रवाह प्रसन्नपणे वेगाने पुढे वाहतो आहे!

त्यांच्या या प्रवासाला आमच्यासारख्या मित्र-मंडळींनी तीस वर्षांपूर्वीच शुभेच्छा देऊन ठेवल्या आहेत आज त्या शुभेच्छांचा फक्त पुनरुच्चार करायचा!

☐ ☐

---

## साभार स्वीकार : कविता

**मुक्तायन** : कुसुमाग्रज; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८४; रु. ३० △ **श्रीधरकृत स्फुट आख्यान काव्ये**: डॉ. अनुराधा कुलकर्णी; सौ. कालिंदी सांगलीकर, कोल्हापूर; १९८५; रु. २० △ **मूर्तिभंजन** : यशवंत मनोहर; श्री. विद्या प्रकाशन पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **लावणी** : रामदास मुळे; नीलकंठ प्रकाशन पुणे ३०; १९८४ रु. ७ △ **मरणगाथा** : शंकर बोऱ्हाडे; नीलकंठ प्रकाशन पुणे ३०; १९८५ रु. ८ △ **रा. ग. गडकरी यांच्या प्रेमसंन्यास नाटकाची पद्यावली** : वसंत देसाई; नीलकंठ प्रकाशन पुणे ३०; १९८५; रु. २ △ **खुणेचं पान**; मनकर्णिका जोग; नीलकंठ प्रकाशन पुणे ३०; १९८५; रु. १४ △ **व्यथाफुली** : सुखदेव ढाणके; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९८३; रु. ५ △ **अभंगांची फुले मोकळी** : रसगंगाधर; सौ. ज्योत्स्ना कुलकर्णी, ताराबाई पार्क कोल्हापूर; १९८४; रु. ३ △ **जलधारा** : शा. कुंतीनाथ करके; सन्मती प्रकाशन हेरले; १९८४; रु. २ △ **रणझुंजार** : शा. कुंतीनाथ करके; सन्मती प्रकाशन हेरले; १९८४; रु. ३ △ **चैत्रपालवी** : कुंतीनाथ करके; स्वरूप प्रकाशन हेरले; १९८१; रु. ६ △

## साभार स्वीकार : समीक्षा, इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान व इतर

**कमल देसाई यांचे कथाविश्व** : रा. भा. पाटणकर; मौज प्रकाशन, मुंबई; १९८४, रु. १९ △ **भवानी पंडिताची बखर** : डॉ. श. गो. कोलारकर- संपा. विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर; १९८५, रु. ४०. △ **पेशवे घराण्याचा इतिहास** : प्र. ग. ओक-संपा. केसरी प्रकाशन, पुणे ३०; १९८५, रु. ८०. △ **मुसलमानी अष्टके आणि दासबाध-मुखवस्त्रे** : डॉ. इंदु लिमये- संपा. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. १२ △ **शुक्लयजुर्वेद दर्शन** : वि. श्री. भाण्डारी, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. २०. △ **ज्ञानेश्वरी प्रदीप** : अध्याय पहिला : रा. तु. पावले; १९८५, रु. ४. △ **मूलगामी मानवतावाद** : व्ही. एम्. तारकुंडे / द्वा. भ. कर्णिक-अनु., श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५, रु. ४०. △ **योगातून आरोग्य आणि रोगनिवारण** : डॉ. के. वि. पानसे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे ४, १९८५, रु. २०. △ **वेदना व अपंगत्व कसे टाळाल?** : डॉ. किशोरी पै, श्री कामाक्षी प्रकाशन, मुंबई, १९८५, रु. १५. △ **विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९८४**, श्री. मा. कुलकर्णी, संपा. विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९८५, रु. १५. △ **स्वप्न आणि सत्य** : स. मा. गर्गे; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १९६५ (२ आ.) रु. २०. △ **शिवणकला** : सौ. प्रभावती पुरम मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई १९८५, रु. ६०. △ **शोभिवंत मत्स्यालय** : ना. चिं. ओक, उत्कर्ष प्रकाशन, पुणे ४, १९८५, रु. १२.

---

# शंकर पाटील : एक अतिमनस्वी व्यक्तिमत्त्व

पुरुषोत्तम पाटील

शंकररावांसंबंधीच्या या लेखाचे शीर्षक 'एक मनस्वी व्यक्तिमत्त्व' असे अगोदर योजिले होते. आणि ते देताना आपण ऊनोक्तीची गफलत केली हे लगेच लक्षात आले. सारेच पट्टीचे कलावंत, साहित्यिक मनस्वी असतात, संवेदनाक्षम असतात हे खरे. पण शंकररावांना ज्यांनी अगदी जवळून पाहिले आहे, त्यांच्या चौफेर कर्तृत्वाच्या नटत्या आलेखाचे जे निकटतम साक्षी आहेत त्यांना शंकररावांबद्दलचे नुसते 'मनस्वी' विशेषण अपुरे वाटेल. कलावंतांतही काही अतिमनस्वी --Super-sensitive- असतात. शंकरराव त्यांपैकी आहेत. त्यांच्या यशस्वी लौकिक आणि साहित्यिक जीवनाची आधारशिला आहे त्यांच्या स्वभावातील दुर्दम्य अशी जिद्द. आणि या जिद्दी स्वभावापाठीमागे आहे ते एक विलक्षण सचेत, सळसळणारे अतिमनस्वीपण.

त्यांच्या साहित्यिक आदर्शांपैकी अर्नेस्ट हेमिंग्वे त्यांना अधिक जवळचा ठरावा. बऱ्याच वर्षांपूर्वी शंकररावांनी Life या अमेरिकन नियतकालिकाचा हेमिंग्वेवरचा एक विशेषांक मला मुद्दाम भेट म्हणून पाठविला होता आणि त्यातील हेमिंग्वेच्या मुलाखतीतील एक वाक्य अधोरेखित केलेले होते. आपण आता लेखनसंन्यास वगैरे घेणार आहात काय? असा प्रश्न मुलाखत्याने पप्पा हेमिंग्वेला विचारला होता. त्यावेळी हेमिंग्वे उसळून म्हणाला- "Retire? How the hell can a writer retire? A Champion cannot retire like anyone else."

ही आठवण सुरवातीलाच देण्यापाठीमागे आजचे शंकरराव माझ्या डोळ्यांपुढे आहेत. साधारणतः वय निवृत्तीकडे झुकायला लागले म्हणजे लेखक साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदाला पात्र ठरतो! शंकरराव नोकरीतून निवृत्त व्हायला आले आहेत. वयाच्या ५९ व्या वर्षी ५९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली आहे. आणि म्हणून मिस्किलपणे हेमिंग्वेच्या मुलाखत्यासारखे त्यांना कुणी डिवचले तर ते तत्काळ उद्गारतील– 'A champion cannot retire!' (हयातभर साहित्यातील पाटीलकी गाजवली ती काही संन्यास घेण्यासाठी नाही!) —यात मला तरी शंका वाटत नाही. पाटलांची जिद्द, त्यांचे अतिमनस्वीपण आणि त्यांचे जीवन व साहित्य यांत कमालीचा अभेदभाव आहे. म्हणून यानंतरही नव्या नव्या लेखनाचा संकल्प त्यांनी सोडला तर नवल वाटायला नको. आणि ते पूर्वीप्रमाणेच कसदार असेल ही गोष्टही तेवढीच खरी. 'सत्यकथा' बंद पडल्यानंतर श्री. पु. भागवतांची आणि शंकररावांची गाठ पडली होती. शंकररावांनी त्याबद्दलची हळहळ व्यक्त करताच श्री. पु. म्हणाले होते–" लिहिता का पुन्हा तुम्ही? करतो 'सत्यकथा' पुन्हा सुरू." 'सत्यकथा' बंद करण्यामागे पूर्वीसारखे सकस साहित्य मिळत नाही ही भागवतांची खरी खंत होती आणि त्यांच्या वरील उद्गारामागे शंकररावांच्या लेखनाच्या सामर्थ्याबद्दल गाढ विश्वास होता.

### कोल्हापूरचे दिवस आणि नंतर...

शंकररावांच्या कथालेखनाचे धुमारे १९५५ सालापासूनच खरे फुटायला लागले होते. त्यावर्षी आम्ही दोघे कोल्हापूरला बी. टी. च्या शिक्षणासाठी एकत्र आलो होतो. रणजित देसाई त्यांच्या मामांकडे राहात. आणि विजया आपटे (नंतरच्या सौ. विजया राजाध्यक्ष). आम्हा चौघांचा चांगला ग्रुप जमला होता. बैठकीचा अड्डा माझ्या होस्टेलच्या खोलीवर किंवा विजयाबाईंच्या घरी. जवळ जवळ रोज. साहित्यिक अभिरुचीच्या बांधणीचे हेच उभारीचे वय होते. आवडलेल्या साहित्यावर चर्चा करणे, परस्परांचे साहित्य वाचून दाखविणे या गोष्टी तेव्हा घडत यात विशेष नवल नाही. पण

आठवतं ते हे की या मैफलीचे हीरो शंकरराव असत. अनुभवांचे अनेक किस्से त्यांच्या गाठी असत. ते ऐकताना आमचे भान हरपे. त्यात रणजित देसाईंच्या मिस्किल चेष्टेची खमंग फोडणी. मैफली रंगत. प्र. बा. वडेर आणि व. ह. पिटकेही मधून मधून या बैठकीत सामील होत. वाङ्मयाच्या अनावर आवडीत मने भिजून चिंब होत होती. हे भिजलेपण उत्तर आयुष्यात आम्हा सर्वांनाच पुरले. म्हणून या दिवसांच्या स्मृती अविस्मरणीय. (विजया राजाध्यक्षांनी आपले अगदी अलीकडचे कथासंग्रहाचे पुस्तक–हुंकार–कोल्हापुरातल्या या आमच्या सहवासातल्या दिवसांना अर्पण केले आहे!)

याच वर्षी शंकररावांची 'माहेर' ही कथा 'सत्यकथे'त छापून आली. आणि रसिकांचे लक्ष त्यांनी आपल्याकडे वेधून घेतले. नंतर लागोपाठ कथा प्रसिद्ध होऊ लागल्या. अधिक बहराचा काळ १९६०–६१ पासूनचा. तो काळ म्हणजे 'सत्यकथे'चे सुवर्णयुग होते. गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर यांच्या बरोबरीने शंकररावांच्या कथा नेमाने 'सत्यकथे'त आणि 'मौजे'च्या दिवाळी अंकांत प्रसिद्ध होऊ लागल्या. भुजंग, वळीव, आभाळ, ऊन, भेटीगाठी–यांसारख्या त्या काळात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कथांनी वाचकांना वेड लावले होते. या सुरुवातीच्या काळात श्री. पुं. च्या उत्तेजनाने आणि चिकित्सक मार्गदर्शनाने पाटलांच्या कथालेखनाला आलेला बहर केवळ अविस्मरणीयच म्हणावा लागेल. '१०० सोमवार' (पुणे) मध्ये राहात असताना रात्र रात्र जागून झपाटल्यासारखे शंकरराव लेखन करीत. कच्चा खर्डा–पक्का खर्डा असा काही प्रकार नसे. जे लिहिले जाई तेच अंतिम. आणि दुसऱ्या दिवशी कथा पोस्टाच्या पेटीत पडे– 'सत्यकथे'साठी आणि दिवाळी अंकांच्या हंगामात दिवाळी अंकांसाठी कथालेखन. तेवढ्यावरच उपजीविका. नोकरी नव्हती. तशात संसार थाटून बसलेले. ('सुभद्राहरणा'च्या चालीवरला 'लीलाहरण अध्याय' हे 'शंकर दिग्विजया'तील एक अतिरोमांचकारी प्रकरण आहे–तो किस्सा खुद्द सौ. लीला वहिनींकडूनच ऐकावा!) त्या काळात–१९६१ मध्ये-शंकररावांनी पत्रातून लिहिले होते–"११ कथा लिहून झाल्या. उद्या बारावी होईल. आणखी २–३ झाल्या की दिवाळीला विराम. लेखन जोरात चालले आहे. त्यावरच जीवनाचा भार आहे. माझा हा प्रयोग यशस्वी होईल असा भरवसा वाटतो, जिद्द बाळगून आहे. माझी लेखणी मला पोटापुरते देईल असा विश्वास वाटतो." '१०० सोमवार' मधील त्यांच्या खोलीत दिवसा साहित्यिक मित्रांसमवेत त्यांची मैफल सदोदित रंगलेली असे. मित्रांना आपल्या ठसकेबाज पद्धतीने खणखणीत आवाजात कथा ऐकवण्याचा प्रघात तेव्हापासून जास्त वाढला असावा. असाच एकदा या मैफलीतून उठून काही कामासाठी मी बाहेर आलो तो वाड्यातील शेजारी-पाजारी, भांडी-धुणी करणाऱ्या मोलकरणी, मुले आजूबाजूच्या दरवाज्यात, पायऱ्यांवर बसलेली! मंत्रमुग्ध होऊन शंकररावांची कथा ऐकत असलेली! पुढे १०-१० / १५–१५ हजारांच्या श्रोतृवर्गाला भारावून टाकणाऱ्या त्यांच्या 'कथाकथना'च्या कार्यक्रमाची ही नांदीच म्हणायची.

**अनुभवस्रोताविषयी थोडे**

इथे शंकररावांच्या साहित्यापाठीमागील (विशेषतः कथा–कादंबरी) अनुभवस्रोताविषयी थोडे लिहिले तर वावगे होणार नाही. 'ग्रामीण जीवन माझ्या मनाचे नंदनवन आहे', 'मी माझ्या बालपणी प्रथम जे विश्व अनुभवले ते इतके तीव्रतेने व रसरसून जगलो आहे की तेच माझ्या कलानिर्मितीतील अनुभवांच्या मांडणीत येते'– या त्यांच्या उद्‌गारांकडे जरा काळजीपूर्वक पाहिले पाहिजे. बालपणातील आणि पौगंडावस्थेतील साऱ्यांचेच मन कमालीचे संवेदनाक्षम असते. शंकररावांसारख्यांचे तर विशेषच. त्या वयात जे पाहिले, अनुभवले ते अखेरपर्यंत 'विसरू म्हणता विसरेना' अशा चिवट ताकदीचे असते. पण खऱ्या कलावंताबाबत हे वरदान एवढ्यावरच सीमित होत नाही. या काळात बांधला गेलेला संवेदनाक्षमतेचा कंद पुढील आयुष्यातही तेवढ्याच ताकदीने आणि तीव्रतेने भोवतालच्या मानवी व निसर्गसृष्टीतील विविध वास्तवाच्या पर्जन्यधारा आसुसलेपणाने झेलीत आणि आपल्या तरल कल्पनाशक्तीची जोड देत नवनिर्मितीचे कोंभ फोडीत असतो. या कंदाचे सत्त्व ज्यांनी जोरासले त्या सत्तरीपार कविवर्य ना. घ. देशपांडे व कै. बा. भ. बोरकर यांनी उतार वयातही प्रणयधुंद, मधुर कविता कशा दिल्या याचे कोडे उलगडू शकेल. नाहीतर 'हे गतजीवनातील बाळपणीच्या आठवणींचे गाठोडे. अनुभव संपले. गाठोडे रिकामे.' अशी सरळधोपट

शेरेबाजी करायला, निर्मिती-प्रक्रियेचे ज्ञान नसलेल्या समीक्षकांना मोठी संधीच असते. या अपसमजुतीच्या विषावर उतारा शंकररावांनीच दिला आहे. अलीकडे निरनिराळ्या सत्कारसमारंभांच्या प्रसंगी त्यांनी व्यक्त केलेले विचार फार मोलाचे आहेत—'अनुभव बाहेरून मिळत नसतात, आतून मिळत असतात'; 'भोगतो तेवढेच लिहिले म्हणजे आत्मचरित्र होते'; 'प्रत्यक्ष अनुभव आणि कलानुभव यात गल्लत नको.' हे आतले अनुभव म्हणजे लेखकाच्या संवेदनाक्षमतेच्या कंदाचे अनुभव. कलात्मक जाणिवेने त्यांना मिळालेली सु-रूप घाटदार अभिव्यक्ती. ही नवनिर्मिती. प्रा. र. बा. मंचरकरही गौरवाने कबूल करतातच की 'शंकर पाटलांनी कलात्मक जाणिवांचा पाठपुरावा नेटाने केलेला दिसतो. बाह्य वास्तवाच्या व्यापक व यथार्थ दर्शनापेक्षा ग्रामीण मनोवास्तवाचाच वेध घेण्याचा त्यांचा प्रयत्न होता. माणसांच्या मनावरील ताणांचे चित्रण करणारी ही कथा साहजिकच प्रयोगशील बनली.' (आलोचना—जुलै ८२). आशयाशी अंगभूत असलेली कलात्मकतेची जाणीव लेखकाला असणे आवश्यकच आहे. शंकररावही आपली ही भूमिका 'भेटीगाठी' हा संग्रह श्री. पु. भागवतांना अर्पण करतांना निःसंकोचपणे, ठामपणे व्यक्त करतात—'माझी कथा यांची कलादृष्टी प्रमाण मानते.' गंमत अशी की श्री. पुं. ची कलादृष्टी प्रमाण मानणारे, घाटाची तीव्र जाणीव ठेवणारे शंकरराव, 'समाजाभिमुखते'चा, 'नैतिक प्रश्नां'चा आग्रह धरणाऱ्या मित्रवर्य भालचंद्र नेमाडे यांची अपेक्षाही पुरी करतात, त्यांच्या कसोटीला उतरतात. नेमाडे म्हणतात की शंकररावांच्या 'टारफुला' या कादंबरीचे "आशयसूत्र मराठी कादंबरीच्या परंपरागत साचेबंदपणाला आव्हान देणारे होते. त्यातल्या एका गावच्या बेबंदशाहीतून, सुरक्षिततेच्या प्रश्नातून आपल्या सबंध समाजाला रूपकात्मक अर्थ देण्याचे सामर्थ्य आहे. हे खरे तर १९६४ च्या सुमारास सबंध देशाचेही रूपक होते. त्यामुळे स्थानप्रधानतेच्या बाहेर कृतीकडे वळणारे नैतिक तपशील ह्या कादंबरीत भरपूर होते." (अनुष्टुभ—सप्टेंबर—ऑक्टोबर ८०). शंकररावांच्या या एरव्ही दुर्लक्षित असलेल्या कसदार कादंबरीकडे श्री. नेमाडे यांनीच प्रथम वाचकांचे लक्ष वेधले. त्यांना ही कादंबरी 'अप्रतिम' वाटते. दोन्ही विरोधी वैचारिक कॅम्पसकडून आपल्या साहित्याबद्दल खुषीची पावती मिळविणारा शंकररावांसारखा साहित्यिक विरळा !

### विपुल, विविध आणि गुणसंपन्न लेखन

शंकररावांनी विपुल लिहिले. विपुल, विविध आणि गुणसंपन्न. सतरा-अठरा कथासंग्रह, दोन कादंबऱ्या, चार वगनाट्ये, चाळिसाहून अधिक चित्रपटकथा, ललितलेख इत्यादी— पण प्रामुख्याने कथाच अधिक लिहिल्या. 'कथा ही माझी निरंतरची प्रेयसी राहिली आहे—मला झपाटून टाकणारी' असे ते म्हणतात ते खरेच आहे. या गुणवती कथेचे वाचकांनी चीज केले. राजमान्यताही मिळाली—'वळीव' ते 'ऊन'पर्यंतच्या पाचही कथासंग्रहांना लागोपाठ (आणि नंतरही 'ताजमहालमध्ये सरपंच' या विनोदी कथासंग्रहाला) राज्यशासनाची पारितोषिके मिळाली. हा विक्रम अन्य कोणी मोडल्याचे स्मरत नाही. तीच गोष्ट चित्रपटकथा आणि चित्रपटसंवाद लेखनाची—विविध पारितोषिके आणि सन्मानचिन्हे! इथेही त्यांचा विक्रम अनुल्लंघ्य. इतके सारे या माणसाने कधी आणि कसे लिहिले याचा कुणालाही अचंबा वाटावा. पण शंकररावांची जिद्द आणि झपाटलेपण ज्यांना माहीत आहे त्यांना याचे नवल वाटत नाही. लेखनकाळात त्यांना लेखनाशिवाय दुसरे काही सुचत नाही. दिवसरात्र तोच ध्यास. मध्ये ५—६ वर्षे त्यांनी वर्तमानपत्रांकडे ढुंकूनही पाहिले नाही—त्यावर लोकांचा विश्वास बसेना. (त्यावर काही दिवसांपूर्वी एका दैनिकात चर्चाही रंगली!) पण घरचे कुटुंबीय आणि आम्ही मित्र याचे साक्षी आहोत. जी गोष्ट हाती घेतली तिच्यात सारा जीव ओतायचा—तब्येतीची पर्वा न करता, असा हा स्वभाव. या लेखनसाधनेमागे एक उग्रकठोर शिस्तही आहे—चिंतनमननाची, अभ्यासाची, चिकाटीच्या बैठकीची.

### 'मला तिसरीत प्रवेश मिळेल का?'—सेवलेकर

पुणे आकाशवाणीवरील आणि 'पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळा'तील नोकरीत त्यांनी याच जिद्दीने जीव तोडून काम केले. पुणे आकाशवाणीवर ग्रामीण कार्यक्रम नुकतेच सुरू झाले होते. ते अल्पावधीत अतिशय लोकप्रिय झाले. त्या वेळच्या त्या कार्यक्रमांच्या जडणघडणीत शंकररावांचा सिंहाचा वाटा होता. त्यामानाने 'पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळा'तील त्यांची नोकरी दीर्घकाळची—गेली २०।२२ वर्षे प्रथम विशेष अधिकारी व नंतर विद्यासचिव म्हणून ते काम पहात आहेत.

पण त्यांनी नोकरीकडे नोकरी म्हणून कधी पाहिलेच नाही. तिथेही नवनिर्मितीचा ध्यास. मराठीतील जुनी प्राथमिक शाळेतील वर्गांकरिता तयार केलेली पाठ्यपुस्तके आणि शंकररावांच्या कारकीर्दीतील तयार झालेली पाठ्यपुस्तके यात जमीनअस्मानचे अंतर आहे. बालवयातील मुलांना पचतील, पेलवतील, रंजवतील आणि त्यांची ज्ञानाबद्दलची गोडी वाढवतील असे धडे त्यांनी या क्षेत्रातील मान्यवरांकडून लिहवून घेतले. शिवाय आकर्षक मांडणी आणि अत्यंत मनोवेधक रंगीत छपाई. यांमुळे ही अंतर्बाह्य देखणी निर्मिती शक्य झाली. मला एक प्रसंग आठवतो-शंकररावांनी नुकतेच मराठी तिसरीचे पाठ्यपुस्तक तयार करवून घेतले होते व त्याची कची मुद्रणप्रत हाती आली होती. 'पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळा'चे संस्थापक, संचालक व सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ श्री. उत्तमराव सेवलेकर यांनी ती प्रत पाहिली, वाचली नि ते इतके भारावून गेले की, त्यांनी त्या प्रतीच्या वरच्याच पानावर एक विलक्षण बोलकी प्रतिक्रिया लिहून ती प्रत शंकररावांकडे पाठविली. त्यांनी लिहिले होते-'मला तिसरीत प्रवेश मिळेल का?' यापेक्षा मोठा गौरव कोणता असू शकतो? पाटलांनी ही प्रत एक अविस्मरणीय souvonir म्हणून जतन करून ठेवली आहे. प्रा. ग. प्र. प्रधानांसारख्या मान्यवरांनीही मराठी ६ वीचे पाठ्यपुस्तक पाहिल्यानंतर शंकररावांना कळविले 'मी सहावीत असताना हे पुस्तक असते तर किती बरे झाले असते!' मराठी पाठ्यपुस्तकनिर्मिती-क्षेत्रातले हे नवे Transformation चे-आमूलाग्र बदलाचे-युग सुरू झाले होते. त्याचा पाया शंकररावांनी घातला अशी महत्त्वाची नोंद आधुनिक महाराष्ट्राचा शैक्षणिक इतिहास लिहिणाऱ्यांना करावी लागेल.

### कथाकथनाचा वेगळा बाज

कथाकथनाची प्रथा लोकप्रिय करण्यात शंकरराव आघाडीवर आहेत. या प्रथेच्या द्वारा मिरासदार–माडगूळकर–पाटील या त्रिमूर्तीने ढंगदार ग्रामीण मराठी कथा सर्वसामान्यांच्या घरादारापर्यंत नेऊन पोहोचवली. यातही मिरासदार–माडगूळकरांचा बाज वेगळा आणि शंकररावांचा वेगळा. पाटील कमालीच्या abandon ने कथा सांगतात – स्वतःला पार विसरून. त्यांचीच एके काळची निर्मिती असलेली ती कथा भुताप्रमाणे जणू काय त्यांचे झाड घरते. निवेदकाचा थरार श्रोतेही अनुभवतात. अशा या तंद्रेत कथेतला प्रत्येक प्रसंग, प्रत्येक व्यक्ती एवढी सचेत होते की श्रोत्यांना सारे काही आपणासमोर घडत आहेसे वाटते. विशेषतः ते संवाद बोलत असले की कथागत पात्रेच त्यांचा ताबा घेतात. त्यांच्या खणखणीत आवाजाला नाट्यपूर्ण आरोह–अवरोहाच्या विविध कडा असतात. बोली भाषा असो की नागर भाषा असो, तिच्यातला ठसका त्यांच्याच आवाजाने पेलावा. 'पिंजरा' बोलपटाच्या चित्रीकरणाच्या वेळी शांताराम बापूंनी त्यातले संवाद शंकररावांकडून पुनः पुन्हा म्हणवून घेतले आणि तंतोतंत तशीच संथा पात्रांना दिली– याचे रहस्य शंकररावांच्या या जिवंत शैलीत आहे. व्ही. शांताराम यांच्यासारख्या चित्रपटमहर्षीपासून तो शंकररावांच्या कथेच्या सामान्य श्रोत्यावाचकांपर्यंत सारे या गुणावर लुब्ध आहेत. कुणी प्रीतमसिंग जुनेजा नावाचा अ-मराठी भाषिक–पण मराठी वाङ्मयाची आवड असलेला– आवर्जून वर्तमानपत्रात लेख लिहून 'लेखणी व वाणी कशी असावी? शंकर पाटलांसारखी– थेट सरळ मनाला जाऊन भिडणारी' अशी सहज प्रतिक्रिया व्यक्त करतो. तेव्हा ती आपलीही सर्वांची असते. केवळ संवादाची झिंग अनुभवण्यासाठी 'एक गाव बारा भानगडी' आणि 'केला इषारा जाता जाता' हे त्यांचे चित्रपट ६–६ वेळा पाहणारे खेडूत मला माहीत आहेत!

### 'मनाची थोरवी पाहून गहिवरलो'–

**बा. भ. बोरकर.**

कलावंत म्हणून काही लोक मोठे असतात. पण 'माणूस' म्हणून ते मोठे असतातच असे नाही. उलट काही तर पराकोटीचे क्षुद्र मनोवृत्तीचे, दांभिक, द्वेषपरायण असतात. अशांच्या अनुभवाने आपण व्याकुळतो. पण शंकररावांसारख्यांचा अपवाद पाहिल्यानंतर मात्र एरव्ही डळमळणारी माणुसकीवरची श्रद्धा टिकून राहाते. शंकरराव काही जीवनमूल्ये मानतात, त्यांना प्राणपणाने जपतात. ज्येष्ठांबद्दलचा आदर, कृतज्ञता हे एक असेच मूल्य आहे. मागच्या वर्षीच्या अ. भा. साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षीय निवडणुकीसाठी पाटील उभे होते, खरात उभे होते आणि कविवर्य बा. भ. बोरकरही. पण बोरकरांसारख्या ज्येष्ठ आणि

श्रेष्ठ साहित्यिक व्यक्तीलाच हा मान अगोदर मिळाला पाहिजे म्हणून त्यांनी बोरकरांसाठी आपले नाव मागे घेतले. त्या वेळी त्यांनी कविवर्यांना लिहिलेले पत्र त्यांच्या मोठ्या मनाचे निदर्शक आहे. ते मला पाहायला मिळाले नसले तरी त्या संदर्भात बोरकरांनी मला ८३ च्या जानेवारीत लिहिलेल्या भावविवश पत्रावरून पुरेपूर कल्पना येते– " शंकर पाटलांचे पत्र वाचताना एकदम माझा गळा दाटून आला. डोळे पाणावून निघाले. माझ्यासाठी आपण नाव मागे घेत असल्याचे लिहिले होते आणि त्या अर्थाची त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद आणि मराठवाडा साहित्य परिषद यांना पाठविलेली पत्रे जोडली होती. मी गहिवरलो ते केवळ त्यांच्या माझ्यावरच्या अकृत्रिम लोभामुळे नव्हे, तर त्यांच्या मनाची थोरवी पाहून. मूल्यपतनाच्या आजच्या काळातही मूल्यांना जपणारी अशी माणसे आहेत याचा प्रत्यय मिळाला हे केवढे समाधान. त्यांनी परिषदेला पाठविलेले पत्र वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाले तर मराठी मन थरकून उठेल आणि अंतर्मुख होईल यात मला मुळीच शंका नाही." पुढच्याच वर्षी बोरकर गेले. हा सर्वोच्च सन्मान न मिळताच गेले. त्याची कळ शंकरराव अजूनही काळजात ठेवून आहेत. पण कविवर्य गेले ते जणू शंकररावांच्या पदरात आपले पुण्य घालूनच. केवढ्या घसघशीत बहुमताने अध्यक्षपदाची माळ त्यांच्या गळ्यात पडली !

रक्ताचीही नातीगोती दुरावण्याच्या, तुटण्याच्या या आधुनिक काळात शंकरराव आपल्या वडील बहिणी-साठी किती व्याकुळ झाले होते तेही आठवते. बहिणीला अन्ननलिकेतला कॅन्सर झाला होता. तिला मिरजेच्या हॉस्पिटलमध्ये ठेवले होते. तिला भेटून आल्यानंतर त्यांनी मला लिहिले होते– " हीच ती वहीण की जिच्या जीवनानुभवातून ' भुजंग ', ' दसरा ', ' सारवण ', 'वेणा' अशा किती तरी उत्तम कथा मला मिळाल्या–मी तिला मात्र काही देऊ शकत नाही याची खंत फार वाटते. मन सैरभैर झाले आहे." हे त्यांचे सैरभैर होणे मित्रांच्या बाबतीतही नेहमीच घडते. आपले सहकारी श्री. तांबोळी यांना ते आपला पाचवा भाऊच मानतात. त्यांच्या आजारपणात शंकरराव किती अस्वस्थचित्त, व्याकुळ झाले होते आणि उपचारांसाठी किती धावपळ करीत होते ते मी पाहिले आहे. आनंद यादवांची विद्यापीठातील जागेसाठी मुलाखत होती. ते तिथे वेळेवर पोहोचावेत, मुलाखत चुकू नये यासाठी शंकररावांच्या जिवाची कोण घालमेल ! माझ्या आणि डॉ. यू. म. पठाणांच्या जीवनातील आत्यंतिक दुःखद प्रसंगी, संकटाच्या प्रसंगी ते मदतीला, सांत्वनाला धावून आले नाहीत असे कधी झाले नाही.

दुसऱ्यांच्या व्यथेवर फुंकर घालायला शंकरराव अग्रेसर. पण स्वतःच्या गंभीर आजाराची जवळच्यांना सुद्धा जाणीव न देण्याची, स्वतःच्या वेदना स्वतःच भोगण्याची त्यांची सोशिक वृत्ती आहे. ८० साली त्यांना दोनदा हृदयविकाराचे झटके येऊन गेले. पण कळवले केव्हा ? बरे वाटू लागल्यावर ! आणि या आजाराशी झुंजही किती चिवटपणे दिली–नंतरही वैद्यकीय उपचार चालू असतांना त्यांनी हृदयविकारा-संबंधी वैद्यकशास्त्राची कित्येक पुस्तके वाचून काढली, टिपणे काढली. कोणत्याही प्रश्नाच्या मुळाशी जाण्याची, खोलवर शोध घेण्याची त्यांची वृत्ती त्यांना कधीच स्वस्थ बसू देत नाही. या आजाराने मृत्यूच्या पैलतीराचे ईषत् दर्शनच जणू त्यांना घडविले. तेव्हापासून मात्र त्यांचे मन अधिकाधिक अंतर्मुख होऊ लागले आहे हे जाणवते. आजारानंतरच्या पाठविलेल्या पत्रात शेवटी त्यांनी लिहिले होते–' ती अज्ञात गूढलिपी हळूहळू परिचयाची होत चाललीय असे वाटते.'

पूर्वायुष्यात–विशेषतः लहानपणी–त्यांनी खूप सोसले. गरीबी एवढी की अनेकदा उपासच पडायचे. अशा वेळी घटा घटा दोन तांब्ये पाणी पिऊन पोट भरण्याची–भूक तात्पुरती शमवायची–सवय लागली. या अपुऱ्या पोषणाचे आणि नंतरच्याही काळातील अतिरिक्त श्रमाचे परिणाम वर उल्लेखिलेल्या आजाराच्या रूपाने भोगावे लागले. अक्षरशः यमदूतांशी झुंजच होती ती. तिथेही त्यांच्या जिद्दीने आणि दुर्दम्य इच्छाशक्तीने मरणाला माघारी पाठविले. वैद्यकीय उपचारांतील कडकडीत पथ्य एवढ्या कसोशीने पाळणारा त्यांच्यासारखा पेशन्ट मी पाहिला नाही. त्यानंतर त्यांनी पूर्ववत् तब्येत खणखणीत करून दाखविली–इतकी की, ते आज रोज पत्रकारनगरा-पासून गणेशखिंडीपर्यंत येऊन-जाऊन तीनचार मैलांची रपेट लीलया करतात–त्यांच्याबरोबर जलद चालणे त्यांच्या तरुण मित्रांनाही अशक्य होऊन जाते. अशा वेळी चेष्टेने माझ्यासारख्याने म्हटले की, ' शंकरराव, you are enjoying a second youth ' तर शंकररावांची पावले आणखी जलद गतीने पडू लागतात.



अनुक्रमणिका

## सफल, संपन्न संसाराचे चित्र–

त्यांच्या जीवनप्रपंचात आणि लेखनप्रपंचात शिस्तीला खास महत्त्वाचे स्थान आहे. प्रत्येक गोष्ट रेखीव, आखीव, उत्तम, व्यवस्थित असावी असा त्यांचा अट्टाहास असतो. कलावंत म्हटला म्हणजे अनियमित, विस्कळित, गबाळा–असेच चित्र बहुतांशी डोळ्यापुढे उभे राहते. शंकरराव त्याला अपवाद आहेत. कुणीही घटकाभर त्यांच्या 'सिंधू' बंगल्यात विसावला, तर तेथल्या टापटिपीने त्याचे मन प्रसन्न होऊन जाते. सर्वत्र उच्च अभिरुचीचे प्रसन्न दर्शन. लेखनाचे टेबल, शेल्फवरची पुस्तके, लेखनसामग्री सारे काही इतके व्यवस्थित की पुसता सोय नाही. एखादा लहानसा कागदही इकडचा तिकडे व्हावयाचा नाही. वाचनासाठीची शेल्फवरची बदलती पुस्तकेही निवडक–त्यांच्या आवडीच्या कसदार मराठी, इंग्रजी लेखकांची. शंकररावांची ही सर्वस्पर्शी शिस्त मात्र सौ. लीलावहिनींना व मुलांना तापदायक होत असावीच. पण आता सर्वांना ती सवय झाली आहे! वहिनींच्याही 'गृहिणीच्या शिस्ती'चा वचक शंकररावांना असतो. वहिनींच्या रूपाने साक्षात् लक्ष्मीचे पाऊल घरात पडले. लग्न झाल्यादिवसापासूनच शंकररावांची सर्व प्रकारची ऐहिक संपन्नता पानी-फुली-फळी डवरू लागली हे मला सारखे स्मरते. शंकररावांच्या अपरिमित कष्टांचा भाग यापाठीमागे आहेच आहे. पण जन्माची सोबतही अशी भाग्यदा असावी लागते. मला पंचावन्न सालचे दिवस आठवतात. चहापुरते दोन आणेही खिशात नसायचे–त्यामुळे त्यांनी त्या वेळी चहा घेणेसुद्धा वर्ज्य केले होते त्याची दुखरी आठवण अजून जागी आहे. दशदिशांनी कवटाळणारे जे दारिद्र्य त्यांनी पूर्वायुष्यात भोगले त्यानेच तर या त्यांच्या जीवनाच्या ईर्ष्येला सतत खतपाणी पुरविले नसेल? काहीही असो. या ईर्ष्येला साथ गृहिणीच्या भाग्याची मिळाली. गृहदक्ष लीलावहिनी, राणी, पमा, आशू, नंदूसारखी हुषार मुले, स्वतःचा बंगला, कार–हे त्यांचे सफल, संपन्न संसारचित्र मनाला फार सुखवून जाते. एकच कौतुकाचा विचार मनात सारखा नादत राहातो–'या माणसाने शून्यातून हे वैभवविश्व निर्माण केले, आणि तेही आपल्या साहित्यगुणांच्या ताकदीवर.'

## लोकप्रियतेची दाद

शंकररावांना लोकप्रियताही अमाप मिळाली. त्यांचे कथासंग्रह गाजले, बोलपट गाजले. वगनाट्ये गाजली. असा हा 'गाजणारा' माणूस. त्यांच्या कथाकथनाची लोकप्रियता तर महाराष्ट्राच्या काना-कोपऱ्यात पसरलेली. महाराष्ट्राबाहेरही इंदूर, बडोदा, गोवा, हुबळी–अगदी दिल्लीपर्यंत या कथाकथनाने मुलुखगिरी केलेली. एवढा मोठा श्रोतृवर्ग आणि वाचकवर्ग अत्रे–फडके यांच्यानंतर, मला वाटते, शंकररावांच्याच वाट्याला आला असावा. या साहित्य-गुणांमुळे मिळालेल्या लोकप्रियतेच्या जोडीला त्यांच्या स्वभावगुणांनी मिळालेली लोकप्रियता. मला तर तीही विशेष महत्त्वाची वाटते. सहवासात आलेल्या प्रत्येकाच्या व्यक्तिमत्त्वाची कदर करीत त्याला आपलासा करण्याची शंकररावांची स्वभावज हातोटी आहे. जवळचेच उदाहरण द्यायचे झाले तर 'पाठ्य-पुस्तक निर्मिती मंडळा'तील त्यांच्या सहकाऱ्यांचे व कर्मचारी वर्गाचे देता येईल. शंकररावांबद्दल त्यांना इतके आदरयुक्त प्रेम वाटते याचे रहस्य त्यांच्या कदरदार स्वभावातच आहे. न रागावता, समजावून सांगत ते कार्यालयीन कामे करून घेतात. Bossingची, मेमोगिरीची, कोरड्याकरड्या शिस्तीची त्यांना घृणाच आहे. त्यामुळे अतीव सौहार्दाच्या वातावरणात त्यांचे कार्यालयीन व्यवस्थापन चालत असते. सध्या त्यांना खास मुदतवाढही मिळालेली आहे. त्यानंतर शंकरराव जेव्हा कार्यालय सोडतील तेव्हा सगळ्यात जास्त चुकल्या चुकल्यासारखे वाटेल ते या मंडळींना.

शंकररावांची संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याची वार्ता कळल्यापासून त्यांच्यावर अभिनंदनपर पत्रांचा वर्षावच झाला. मुख्यमंत्र्यांपासून ते कुठेतरी दूर खेड्यात टपरीवजा हॉटेल चालविणाऱ्या सामान्य गावकऱ्यापर्यंत – विविध स्तरांतील लोकांनी शंकररावांचे उत्स्फूर्तपणे कौतुक केले. कुणी भेटी पाठविल्या. महाराष्ट्रात ठिकठिकाणी सत्कारसमारंभ झाले– मोठमोठ्या साहित्यिक-सांस्कृतिक संस्थां-पासून ते त्यांच्या गावच्या ग्रामस्थांपर्यंतच्या सत्कार–समारंभांतील हार्द केवळ अवर्णनीय म्हणावे लागेल. या काळात त्यांना मिळालेली सन्मानचिन्हे आणि सन्मानपत्रे फार बोलकी आहेत. त्यांचे पट्टण कोडोली गाव हे प्रामुख्याने धनगरी व्यवसायाचे. त्यांच्या गावकरी मित्रांनी त्यांना सन्मानपत्र सादर केले ते घोंगडीच्या एका छानशा तुकड्यावर लिहून! अतिशय कलात्मक सजावट असलेले आणि इतके समुचित मानपत्र

दुसरे क्वाचतच असेल. अशी लोकप्रियतेची दाद फार थोड्यांच्या नशिबी असते. शंकररावांना ती मिळाली त्यापाठीमागे त्यांचा लोकसंग्रह आहे. पण लोकसंग्रहासाठी लोकसंग्रह त्यांनी केला नाही. त्यांच्या सहज, निर्भरशील, प्रेमळ स्वभावाचे हे फलित आहे. बरेचसे कलावंत स्वतःच्या कोषातच स्वतःला बंदिस्त करून घेतात. ते माणूसघाणे असतात. शंकरराव माणूसवेडे आहेत. अतिमनस्वी असूनही ते कधी स्वकेंद्रित राहिले नाहीत. भोवतालच्या दुनियेवर अशी मनापासून प्रेम करणारी माणसेच आपल्या साहित्यनिर्मितीतून लोकाभिमुखतेची पताका उंच फडकावीत ठेवतात. पण लोकाभिमुखतेच्या या पताकेचा रंग इंद्रधनुषी कलात्मकतेचा आहे– कधीही न विटणारा.

म्हणूनच त्यांच्याबद्दल म्हणावेसे वाटते– He is a Class writer of the Masses !

□ □

## वर्गणीबाबत विनंती

ज्या वार्षिक साधारण सभासदांनी जून १९८५ अखेरची वर्गणी रु.२०|– अद्यापी भरलेली नाही त्यांना व्यक्तिगत स्मरणपत्र पाठविले आहेच. त्यांनी ही वर्गणीची रक्कम कृपया आपापल्या शाखेकडे किंवा परिषदेकडे सत्वर पाठवावी.

तसेच चालू १९८५–८६ या वर्षाचीही वर्गणी सत्वर पाठवावी.

जे सभासद हप्त्याने आजीव सभासद होत आहेत त्यांनीही आपली उर्वरित रक्कम लवकर पूर्ण करावी ही विनंती.

कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद**

□

## दिवाळी – अंक स्पर्धा

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी प्रकाशित होणाऱ्या तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना तीन ज्येष्ठ संपादकांच्या नावे १०१ रु. ची तीन पारितोषिके दिली जातात. स्पर्धेचे यंदाचे सातवे वर्ष आहे.

ज्यांना या स्पर्धेत भाग घ्यावयाचा आहे त्यांनी आपल्या दिवाळी अंकाच्या प्रत्येकी २ प्रती परिषदेकडे दि. २५|११|८५ पर्यंत पाठवाव्यात ही विनंती.

कै. अनंत काणेकर यांच्या नावे दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललितलेखास २०० रु. चे एक पारितोषिक ठेवण्यात आले आहे. या गोष्टीचीही लेखक आणि संपादक यांनी नोंद घ्यावी.

कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद**

# कानडी-मराठी भाषा आणि जी. एं.ची कथा

म. द. हातकणंगलेकर

'साहित्य म्हणजे भाषेचा विशेष उपयोग' अशी साहित्याची एक कलावादी व्याख्या आहे. साहित्याचे अंतिम रहस्य साहित्यकृतीच्या शैलीतच शोधावे लागते असेही एक सिद्धान्तवजा मत प्रचलित आहे. एकांतिक मताचे रोमांचकारी आकर्षण अल्पसंख्य गटासाठी असते. कालांतराने त्यातले अंशमात्र तथ्य अलग होते, बाकीचा अभिनिवेश विरून जातो. असे असले तरी भाषेचा उपयोग साहित्यात कसा होतो याचा अभ्यास उद्‌बोधक ठरतो यात मुळीच शंका नाही. या अभ्यासाची अनेक अंगे असू शकतात. त्यातले एक अंग म्हणजे भाषेचा विशिष्ट प्रदेशातील जीवनरीतीशी असलेला संबंध. दोन भाषांच्या सीमारेषेवर असणाऱ्या प्रदेशातील भाषा आणि तिचे गुणधर्म कळत नकळत जिच्यात कमीजास्त प्रमाणात उतरले आहेत अशी भाषाशैली तिच्यातील वेगळेपणाने नजरेत भरते. तिची काही वैशिष्ट्ये तपशीलाने नोंदविताना गंमतीशीर वाटू लागतात. कानडी मराठी भागात राहणारे कानडी लेखक अगर मराठी लेखक यांची शैली तपासतांना ही वैशिष्ट्ये ध्यानात येतात. या तऱ्हेच्या मधल्या पट्टीत राहणारे अनेक लेखक असू शकतील, पण त्यातल्या अव्वल दर्जाच्या लेखकांची शैलीच साहित्याचा अभ्यास करणाऱ्या व्यक्तीला या संदर्भात लक्षात घ्यावी वाटणार. भाषेचा अभ्यासक असा आग्रह कदाचित धरणार नाही...जी. ए. कुलकर्णी यांच्या भाषाशैलीचा विचार या दृष्टीने करता येईल असे दिसते. त्यांची मराठी भाषाशैली, मराठी म्हणून वैशिष्ट्यपूर्ण आहेच पण तिच्यावर तरळणाऱ्या कानडी भाषेच्या छाया आणि तिच्या लयीत असणारे कानडी भाषेचे नाद हे त्यांच्या शैलीला निराळीच अर्थपूर्णता मिळवून देतात असे दिसते. त्याआधी कानडी आणि मराठी या दोन भाषांच्या मूळ धाटणीत जो फरक आहे त्यासंबंधी स्थूलमानाने जे निरीक्षण करण्यात आले आहे ते प्रथम ध्यानात घेणे योग्य होईल. 'मराठी शिकताना एका कन्नडिगाचे अनुभव' हा लेख विरुपाक्ष कुलकर्णी यांनी 'भाषा आणि जीवन' दिवाळी १९८४ च्या अंकात प्रसिद्ध केला आहे. श्री. कुलकर्णी यांचे वास्तव्य गेली २० वर्षे पुण्यात आहे. ते मूळचे कन्नड भाषिक आहेत. श्री. कुलकर्णी यांची काही निरीक्षणे विशेषतः बेळगावामध्ये बोलल्या जाणाऱ्या कानडी-मराठी संबंधीची अशी :—

( १ ) बेळगावमध्ये दोन्ही भाषा व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आणि सरमिसळ स्वरूपात आहेत.

( २ ) तेथे मराठी कन्नडप्रमाणे हेल काढून बोलण्याची पद्धत आहे.

( ३ ) या मराठीवर दुसरा कन्नड प्रभाव म्हणजे इथला माणूस 'मी काम केलो' असे म्हणतो.

भूतकाळातही कर्त्याप्रमाणे क्रियापद बदलायची पद्धत ही कन्नड भाषेची आहे.

( ४ ) इंग्रजीप्रमाणे कन्नड भाषेत फक्त स्त्री-पुरुषांना स्त्रीलिंगी पुल्लिंगी मानले जाते, अन्य सर्व नपुसकलिंगी. त्यामुळे मराठीतले लिंगभेद कळत नाहीत. तो खांब, ती तुळई असे का ?

या निरीक्षणाचा प्रत्यय तावडतोब येऊ लागला. 'सम्बंध' नावाचे एक त्रैमासिक आम्ही प्रसिद्ध करीत आहोत. दर अंकात एका प्रांतीय भाषेतील समकालीन साहित्याचा मराठी अनुवाद व मराठी भाषिकांसाठी परिचय करून देणे अशी सामान्य भूमिका आहे. पहिला अंक कानडी साहित्याबद्दलचा आहे. या अंकासाठी आलेले अनुवाद पाहत असताना वरील प्रत्यय येत राहिला. लिंग भेदासंबंधीचे घोटाळे तर ठिकठिकाणी दिसतात. काही नमुन्याची वाक्ये पहा. ( हे अनुवाद

सीमाभागातील दोन भाषा जाणणाऱ्या व्यक्तींनी केले आहेत.)

( १ ) म्हातारबाई गारठ्याने कुडकुडत असलेलं पाहून.

( २ ) असे त्याने शेरा मारला.

( ३ ) तब्बर या वादामध्ये दोन तीन लोकांच्या पावत्या फाडला.

( ४ ) फायली खालून वर वरून खाली पळून खेळत होते.

या मोठ्या वाक्याची रचना आणि लयदेखील अमराठी आहे हे त्वरित ध्यानात येते–' हे डॉक्टर लोक म्हणजे फारच गलिच्छ बाई ! माणसाचे शरीर उभे–आडवे कापून, त्याचे बारिक बारिक तुकडे करून, प्रत्येक तुकड्याचे Analyse करून सर्व सर्व पाहिलेले हे लोक ना ! ' अशा प्रकारचाच हेल एकाद्या लहान वाक्यातही दिसतो,–एवढे मला कळत नाही म्हणून समजला काय?

दैनंदिन भाषेतदेखील अनपेक्षित संस्कृत शब्दांचा वापर हे आणखी एक वैशिष्ट्य. ' मुली 'च्या ऐवजी ' कन्या ' हा शब्द वापरला जाईल. ' कष्ट ' (शारीरिक) याऐवजी ' क्लेश ' वापरला जाईल. जोड शब्दांची धाटणी कानडी, मराठीत वेगवेगळी आहे. आपण पडशील विडशील म्हणू तर कानडीतून मराठीत ते बडशील गिडशील असे होतांना दिसते. म्हणी हे तर लोकभाषेचे खास अलंकरण. प्रत्येक भाषेतील म्हण त्या त्या लोकांच्या जगण्याचे वेगळेपण दाखवीत असते. शिवराम कारंत यांच्या एका कादंबरीचे मराठी भाषांतर 'मिटल्यानंतर' या नावाने प्रसिद्ध झाले आहे. त्यातल्या सहजपणे वेचलेल्या या दोन म्हणी ' सरकारचे पैसे दिवसाला मिळत असतात बारशाला नव्हे ' मूळ कानडीतील बोच आणखीनच तिखट असणार. दुसरी म्हण, ' कुत्रा भुंकला म्हणून देवलोक ओसाड होईल काय? ' कानडी साहित्यातील प्राणीजीवन ठळक असणार ! जी. एं च्या कथांमध्ये तर ते फारच ठसठशीत असते. गाय, कुत्रे, मांजर, सरडे, हरतऱ्हेचे किडे यांची जी. एं. नी केलेली वर्णने केवळ प्रत्ययकारी आहेत असे नव्हे तर, विश्वरचनेत त्यांचे एक विशिष्ट स्थान कसे आहे याची जाणीव त्यांच्या प्राणी-चित्रणातून मिळते. काही प्राण्यात जसे मानवी कोमल भाव असू शकतात तसे काही माणसात हिंस्र पशूची लक्षणेही दिसतात, तेव्हा हे दोन्हेही तितक्याच महत्त्वाचे चित्रणाचे विषय आहेत. 'सोडवण' या कथेतील डॉ. दादा फाटक यांचे व्यक्तिचित्र म्हणजे आयुष्य चित्रच आपण ध्यानात घेऊ– ' त्यांच्या निष्काळजीपणाने त्यांची गोड मुलगी विहिरीत बुडून नाहीशी झाली आहे याचा शाप फाटकांचे आयुष्य ग्रासून टाकतो आहे.' याचे दिग्दर्शन करताना जी निरनिराळी वाक्ये जी. ए. आपल्या कथेच्या पटात विणत जातात, ती पाहण्याजोगी आहेत,–' फाटकाच्या आत काहीतरी पिरगाळल्यासारखे झाले व ते कोपऱ्यात सापडलेल्या श्वापदाप्रमाणे एकदम जागरूक झाले–' त्यांनी दातेकडे पाहिले. एखाद्या फळावर अळी बसावी तसे ते उभट ठिपक्यासारखे डोळे घेऊन खुर्चीवर आत्मविश्वासाने बसले होते. त्यांचा बाळमित्र दिवगी भेटतो आणि तो फाटकाना सांगू लागतो, ' पांढरा शुभ्र घोडा असावा, त्यावर बसून बाणाच्या वेगाने दमेपर्यंत धावावं. केंब्रिजला असताना घोड्यावर बसणं शिकण्याचा मी प्रयत्न केला. पण सालं व्हायचं काय, तर घोड्याच्या तोंडाकडं पाहिलं. त्याचे चौकोनी दात दिसले की हातपाय गळायचे ! '

' वस्त्र ' ही जी. एं.ची एक जबरदस्त कथा. दूरवरच्या माळरानात उभ्या असलेल्या हॉस्पिटलमध्ये किरकोळ काम करून निर्वाह करणारी एक निराधार बाई. ते हॉस्पिटल सोडून तिला जाणे भाग पडते. आतापर्यंत तिची सोबत एका कुत्र्याने केलेली असते. त्या कुत्र्याकडे पाहताना तिच्या मनात विचार येतात. त्याच्या डोळ्यात पाहताना तिला आपलेच चित्र दिसू लागले. हे कुत्रे कुणाचे कुणास ठाऊक, पण एका रात्री चिंधीसारखे भिजून पायरीवर ओरडू लागले. ते नेमके याच पायरीवर का बरे आले? तसे पाहिले तर आपण तरी नेमक्या याच ठिकाणी का आलो? दोघेही चोरून मारून आणलेल्या अन्नावर वाढलेले आणि कुठे जायचं म्हणजे दोघांनाही जागा नाही. ती गाव सोडण्याचा प्रयत्न करून परत त्याच जागी येते. विकायला गेलेले जनावर गिऱ्हाईक नसल्याने पुन्हा त्याच गोठ्यात यावे तसे तिला वाटले.

' राधी ' या प्रसिद्ध कथेतही एक काळे कुत्रे आहे. त्याबद्दल गणेशवाडी भट नावाचे एक खमंग पात्र बोलते, ' तू चिंधीचोर तेवढा मला शिकवायला बाकी राहिला होतास बघ ! अरे, या कुत्र्याला काही खायला दिलं तर जगेल तरी. मी मरायला लागलो तर येऊन जाईल, घसा ताणून ओरडेल तरी; पण तुमच्यासारख्यांची ढुंगणं

धूत जन्म काढला तर करंगळीवर तुम्ही मुतायला तयार होणार नाही.'

दुसरे एक पात्र म्हणते, 'ए एडक्या व्यंग्याची खोली झाडून ये.'

दुसरीकडे 'डुकरचंदानो' असा एक शब्दप्रयोग आहे. म्हणीवजा वाक्येही पेरलेली आढळतात.

'म्हणतात की भिकेत कावळा हागला, तसली गत!'

'तो कामाचा माणूस, तुझ्यासारखा तो शेणडुंगण्या नाही.'

'मला नवरा नाही, मुलगा नाही, मुलगी नाही. एखाद्या मुसळासारखं माझं आयुष्य आहे.

जी. एं. च्या कही कथांतून प्राणीजीवनाचे जे दर्शन घडते त्याचा आणि जी. एं. च्या जीवनदृष्टीचा जो अंतस्थ संबंध आहे, त्याचे विश्लेषण अधिक खोलात जाऊन करण्याची गरज आहे. शेक्सपीअरच्या साहित्यातील प्राणीजीवनाच्या प्रतिमांचा असा अभ्यास करण्यात आला आहे. विशेषतः त्याच्या शोकात्म नाटकात या प्रतिमांचा लक्षणीय उपयोग दिसून येतो असे अभ्यासकांचे मत आहे.

□ □

---

## साभार स्वीकार
### चरित्रे

**अमृतसिद्धी :** द. वि. तेंडुलकर ( प्रफुल्ल दत्त ); मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; १९८५; रु. ६० △ **हर्ष खेद ते मावळले :** ना. वा. फडके; श्रीविद्या प्रका. पुणे ३०; १९८५; रु. ५० △ **हरि विठ्ठल ऊर्फ भाऊसाहेब तुळपुळे :** कमल भागवत; डॉ. टी. एच्. तुळपुळे; मुंबई १४; १९८५; रु. ५ △ **कहाणी शोध-शोधकांची :** दत्ता उमराणीकर; सुनील प्रका. कोल्हापूर; १९८५; रु. २० △ **आनंदकुमार स्वामी;** डॉ. ग. ना. जोशी-अनु. ; कॉन्टिनेंटल प्रका. पुणे ३०; १९८५; रु. २५;

---

## नवीन आजीव सभासद
( १-४-८५ ते १५-८-८५ )

**पुणे विभाग :**

सर्वश्री प्रभाकर गो. दवे, इंदुमती देव, अर्जुन देव, देवीदास सडेकर, नंदकुमार देवरे, नागनाथ बा. जाधव, गोविंद चिं. मालशे, श्रीकृष्ण ह. ठाकूरदेसाई, ना. सी. दातार, अरुण वि. पारगावकर, गोपाळ कृ. पटवर्धन, आप्पासो तथा काशिनाथ ह. मलकापुरे, प्रभाकर द. गनबोटे, नारायण ह. कुलकर्णी, प्रतिभा दि. हणमसागर, अनिल द. मानकर, गोविंद वि. बेडेकर, भगवान शं. पुणेकर, शरदचंद्र ग. ठकार, नामदेव पां. क्षीरसागर, मोरेश्वर फडके, माधवी पटवर्धन, सौ. जयश्री नी. कर्वे, अविनाश शं. गानू, हिमांशु वि. खारकर, केशव वि. सराफ, राधा मो. गोडबोले, प्रभाकर पु. गोखले, साधना प्र. सराफ, नंदकुमार शि. कदम, डॉ. कमल शेटे, विश्वास वि. दीक्षित.

**पुण्या बाहेरील :** सर्वश्री तानाजी प. महाले, विजया द. सोनार, ( दोन्ही सभासद धुळ्याचे ) आत्माराम भु. पाटील, ब्रिजलाल पाटील ( नवापूर ) जसवंतसिंग सोनवणे ( जळगाव ), व एम. एल. पाटील ( जळगाव ), लक्ष्मण अ. टेहलाणी, विश्वनाथ जगदाळे, आशा सौंदत्तीकर, संजय ग. होगाडे, श्रीकांत भिडे, अशोक गो. गोवंडे, (सर्व सभासद इचलकरंजीचे ) मे. वि. धोंगडे ( नाशिक रोड ) शंभुनाथ ग. कहाळेकर, मेघना वि. कुलकर्णी, विक्रम वा. भावे, रवींद्र ग. आवटी, हरी रा. इनामदार, (सर्व डोंबवलीचे) श्रीपाद भा. भागवत, ( गिरगाव ), सुरेश य. म्हात्रे, माधव शं. काळे ( दोन्ही ठाण्याचे ) नंदकुमार भगत, सौ. सुमती लांडे, ( श्रीरामपूरचे )

---

# एका कथेचा जन्म

आनंद पाटील

माझी 'गडदा' ही सत्यकथेच्या मार्च १९७६ च्या अंकात प्रसिद्ध झालेली कथा. 'गडदा' हा शब्दच वाचकाला गोंधळात टाकणारा. या कथेच्या लेखनापूर्वी 'खेप' व 'जलम' जशा लिहिल्या तशा 'सत्यकथे'त छापून आल्या होत्या. पण 'गडदा'ने बरेच परिश्रम घ्यायला लावले. हौस, गंमत म्हणून लिहिता लिहिता 'लेखन गंभीरपणे करायला हवं' (श्री. पु. भागवत यांनी पुढे दिलेला सल्ला) इथं पर्यंतचा प्रवास व्हायचा होता. त्या आधी कसोटी पाहणारी कथा म्हणून मी 'गडदा'कडे पाहतो. ती माझी एक आवडती कथा आहे. म्हणूनच ती चर्चेसाठी निवडली. वळवाच्या पावसासारखं कधी तरी लेखन करणाऱ्यानं अशा कुळकथा सांगणं थोडं विसंगतच.

सत्यकथेत पहिली 'खेप' आली तेव्हा माधव कोंडविलकरांनी मिष्किलपणे शंका नोंदविली होती की, आनंद यादव व आनंद पाटील यांच्या कथांची अदलाबदल झाली आहे काय? खरं म्हणजे व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, यादव यांच्या कथा वाचून काहीतरी लिहावेसे वाटत होते. माझा अभ्यासविषय इंग्रजी. मराठी-कथा, उद्‌गम विकास वगैरे अज्ञातच. आपले अनुभव वेगळे आहेत, काहीतरी सांगण्यासारखं पुसटसं जाणवतयं ही अपरिपक्व जाण. धडपडणारी मनोवृत्ती. सूर्यकांत खांडेकरांनी 'लिहा नि संपादकांना पाठवा' असा सल्ला दिलेला. सुरवात छंद म्हणून. लेखननिष्ठा वगैरे नंतर. हळूहळू कळत न कळत उमगणारी बाब....

**गडदाचे बीज**

सगळंच धूसर, पुसट. जन्मकथेची कुंडली मांडणं कठीण. आठवते ती एक ढोबळ घटना. मामांच्या गावात घडलेली. लहानपणी कधीतरी कानी पडलेली. 'थानतुटा' झाल्यापासून मराठी शाळेत जाईपर्यंतचं माझं बालपण मामांच्या गावी गेलं. सावे नावाचं हे खेडं. आजोळ कडवीनदीकाठी तर वडलांचं शित्तूर हे गाव पन्हाळ्याच्या पश्चिमेच्या डोंगराच्या कुशीत. दोन्ही घरं हालाखीतलीच. पण आजोळी त्यातल्या त्यात बरा ओलावा. आजोबा फार प्रेमळ. थोरल्या मामांना पहिली पोरगीच झाल्यानं भाचे जावयाचं लाड (तीन पिढ्यांचा पदर?) मधला मामा चांगला पैलवान. तो व चुलतमामा पुरात पोहणे, रात्री कुरणात खिलार बैलं, दुभत्या म्हशी चारणं, यात्रेच्या गाड्याला देखणी बैल जोडी पुढं लावणं असले पराक्रम गाजवत. त्यांची वसती मळ्यातल्या टेकाच्या राखणेवर. मामा भरदार, आटीव, गोरापान. मी आईला म्हणे "तू काळी, आम्ही काळे, डोंगरातली माणसं काळी, नदीकाठची माणसं गोरी. असं का?" आणि कधीतरी भाऊबंदकीच्या 'आतल्या' नि 'बाहेरच्या' तिड्यांची ओळख करून देणारी ती घटना कळली. मधला मामा नि चुलत मामा नदीला पूर आल्यावर अंड्यावरचे मासे पकडायसाठी वळणावर गडदा लावायला गेले. तिन्हीसांजेला लावलेला गडदा पहाटे काढायचा. रात्रभर त्याची राखण करायची. वैऱ्यांनी डाव साधला. या दोघांच्या अंगावर घोंगडी टाकून उशापायशाला उभं राहून त्यांना चोप दिला. कुणी मारहाण करून गडदा कापून गेलं कळलं नव्हतं. रिजाल् पैलवानांना गालबोट लागलं. मैदानात प्रतिस्पर्ध्याला माती चारणाऱ्या गड्यांना कोंडी करून झोडपलं म्हणून माणसं हळहळत. 'येवड्या दांडग्या गड्यास्नीवी मारणारं हाईत म्हणाईचं? का बरं करत्यात आसं ही मान्सं?'

कधी काळी कानी पडलेली घटना ही एवढीच. बोरीच्या काट्यागत रुतणारी सल. मग कधीतरी वाचनात आलं स्टीफन स्पेंडरच्या मनात कवितेची एक ओळ सात वर्षे घोळत होती. जॉईस कादंबरीची पहिली पाने

कित्येक वर्षे लिहीत होता. या संस्कारांचा प्रत्यक्ष कथेशी कसलाच संबंध नाही. बऱ्याच वेळा वाटायचं, या प्रसंगावर कथा लिहावी. पण घटनाप्रधान पारंपारिक गोष्ट घडणे वा घडविणे मला नको होते. सूरच सापडत नव्हता. कथा नेमकी कुठे सुरू करावी हेही कळत नव्हते. चालढकल करता करता ती लिहायचे राहून जायचे.

माझा लहान भाऊ मॅट्रिक नापास झाला. त्याला मला खूप शिकवायचा होता. पण आमच्या घराला भाऊबंदकीची मोठी झळ पोचली. नाइलाजानं त्याला शाळा सोडून दळण कांडपाचा धंदा करावा लागला. मला प्रश्न पडला, तिन्ही मामा अशिक्षित. धाकला मामा "बैलं राखतो पण शाळा नको" म्हणाल्याचं आईनं सांगितलं होतं. खेकडी, मासं, ल्हावऱ्या पकडण्याच्या नादानं शाळा सुटल्याची उदाहरणं मला माहीत होती. परंतु भाऊबंदकीच्या संघर्षात शिक्षणाला मुकलेली, खुरटलेली मुलं काही कमी नव्हती. कुठल्या संस्कारांनी त्यांचा बळी घेतला ? असा गुंता वाढत होता. प्रश्न, विधानं, प्रसंग अशी साखळी मनातल्या मनात जुळत होती. परंतु हा आशय कथेतून कसा व्यक्त करायचा ?

एकदा कसावसा आराखडा तयार झाला. त्यात मूळ घटना वेगळयाच पद्धतीने उतरली. मामांना मारल्याच्या घटनेला काट बसली. लक्ष गडद्यावरच केंद्रित झाले. कथेचा ताबा एकट्या मामाने घेतला. संसारी तुका हे रूप. चुलत मामाचा साधा उल्लेखही कुठे येत नाही. तो हद्दपार झाला. पहिल्या खर्डयात लेखनाला रिपोर्टचे रूप आले होते. गडदा कापणे व गोपाची शाळा सुटणे या मध्यवर्ती कल्पनेभोवती सारी कथा फिरली होती. असमाधानाने कागद तसेच ठेवून दिले.

दुसरा प्रयत्न करून पाहिला. फारशी प्रगती झाली नाही. कथेत नंतर आलेली तुकाची बायको या लेखनाच्या वेळी कुठेच हजर नव्हती.

तिसऱ्यांदा 'गडदा' लिहिली. शीर्षक मात्र तेच राहिले. वरवरचे बदल केले. मी कथा प्रसिद्धीपूर्वी सहसा कुणाला वाचायला देत नाही. या काळात मराठी व्याकरणाचा धसका घेतल्याने एका 'जाणकार' प्राध्यापकाला ती वाचायला दिली. त्यांनी तिचा शेवट बदलून 'थोडा आकर्षक, धक्कादायक कलाटणीवजा' वगैरे करण्याचा सल्ला दिला. मला तो फारच नकली, सामान्य वाटला. तसा बदल मी मुळीच केला नाही. व्याकरणाच्या चुका दुरुस्त झाल्याच्या समाधानात कथा तशीच ठेवून दिली.

पावसाळ्याचे दिवस. रात्रीचे जेवण झाले होते. साताऱ्याच्या शिवाजी कॉलेजच्या प्राध्यापक निवासाचा आवार पावसाच्या झडीनं झोडपून निघत होता. गावाकडच्या आठवणींच्या सरी वर सरी यायला लागल्या, आवंदा अंड्यावरचं मासं घेऊन मामा शितूरला गेला असेल ? पहिला जिव्हाळा आता राहिला नाही. आबा, आजीच्या मागणं सारं गेलं. भावांच्या गड्यातलं मासं, मक्याची कणसं, रसाची घागर आईला मिळत नाही. तिचं माहेरच तुटलंय. उरल्यात त्या आठवणी. मामा वेगळे राहिलेत. जुनं घर पडलंय... या आठवणींच्या गर्दीतून तुकाची बायको नवऱ्याची वाट बघत बसलेली स्पष्ट दिसू लागली आणि पहिले वाक्य कागदावर उतरले. मामाच्या गावच्या मातीच्या वासानं झपाटल्यागत तपशील घरारा उतरत गेला...

— आणि कथा नक्की छापून येणार या धुंदीत असतानाच श्री. राम पटवर्धनांचे पत्र आले... 'कथा तपशीलाने जडावलीय. कलात्मक उंचीला पोहोचत नाही... तुमचे मत कळवा' इत्यादी. मी पटवर्धनांना अजून पाहिलेही नव्हते. त्यांचे देखणे हस्ताक्षर आणि मोजके शब्द तेवढे डोळ्यांपुढं तरळत. अस्वस्थता, स्वतःवरची चीड अपयशाची बोच लपवत हस्तलिखित डायरीत ठेवून दिले. नेमकं चुकलं काय ? तपशीलाने जडावलीय म्हणजे नेमके काय ? कलात्मक उंची कशाला म्हणायची ? काही 'ढ' कळत नव्हतं.

मग कलात्मकता आशय, अभिव्यक्ती इत्यादी शब्दांचे अर्थ समजण्यासाठी समीक्षा (मराठी, इंग्रजी) धुंडाळली. सहकाऱ्यांशी ढोबळ चर्चा केली परंतु हाती फारसं काही लागलं नाही. गोखले-गाडगीळ ते बोराडे यांच्या पर्यंतच्या कथाकारांचे कथासंग्रह, मुलाखती वगैरे वाचत होतो. या काळात कथा लिहायची (यशस्वी) गुरुकिल्ली मी शोधत होतो हे आज आठवलं म्हणजे हसू येतं.

काही दिवसांच्या गॅपनंतर 'गडदा' पुन्हा वाचली. रा. रं. बोराडे नि आनंद यादवांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांचे कसे कसे संस्करण केले त्याच्या हकीगती कुणाकडूनतरी कळल्या होत्या. कुठल्याच सिद्धहस्त कथाकाराशी माझी ओळख नव्हती. इंग्रजी–मराठी वाचन हाच आधार. रायटर्स अ‍ॅट वर्क ही चाळलं होतं.

असो. संपादकांना काय खुलासा कळवावा हा प्रश्न होता. कथा पुन्हा लिहून पाठवतो असच कळवलं असावं. नव्या उमेदीने ' गडदा ' पुन्हा लिहायला घेतली. कथेची मागणी म्हणून बबल्याची भर पडली. त्याच्या आईच्या तोंडी लोककथा आली. ही लोककथा मुळात आमच्या आजीच्या तोंडची. विनोद सहजासहजी जमून गेले. ' गडदा ' प्रतिकाच्या पातळीवर पोहोचतेय असे वाटू लागले तसा धीर आला. येटस्, इझरा पाऊंड वगैरे कवींच्या कविता शिकवल्याचा हा अप्रत्यक्ष परिणाम असावा. अर्थात कथा पूर्ण झाली तरी ती प्रसिद्ध होईलच याची खात्री नव्हती.

कथा स्वीकारल्याचे संपादकांचे पत्र आले. पण गंमतीची गोष्ट अशी की पान क्र. ७ माझ्याकडेच राहून गेले होते. ते पाठवून देण्याबद्दल पटवर्धनांनी कळवले होते. अधिरतेने फाईली चाळल्या. सुदैवाने नेमके तेच पान सापडले म्हणून पुढील घोटाळे टळले. आता ' गडद्या 'त काय सापडते याची प्रतिक्षा करण्यातही आगळा आनंद होता.

अशी ही ' गडदा 'ची जन्मकथा. या अनुभवाने मी दोन गोष्टी मनात नोंदवल्या. लिहिता लिहिता शिकायला हवं. पूर्वसूरींच्या प्रभावातून बाहेर पडायचं तर आपली वाट आपणाला सापडायला हवी. लेखन शिस्तवार, गंभीरपणे, परिश्रमाने करायची गोष्ट आहे. एका जाणकार वाचकाला ' गडदा ' ग्रामीण सुशिक्षितांच्या परिस्थितीचे प्रतिक म्हणून नेमकी उमगल्याचं बोलता बोलता समजलं आणि दिलासा मिळाला. राम पटवर्धनांची पत्रे हा वळणावर पाण्यात बुडून गडद्याच्या दोऱ्या कशा गुंतवाव्या याचे अप्रत्यक्ष धडे देणारी साधनं होती. या सुरवातीच्या अनुभवाचा मला पुढे फायदा झाला, होईलही.

□ □

# ग्रंथ-परीक्षण

: १ :

## तौलनिक साहित्याभ्यास : मूलतत्त्वे आणि दिशा : वसंत बापट

**परीक्षण : अशोक रा. केळकर**

[ मौज प्रकाशन व आंतरभारती, मुंबई. मूल्य रु. १२ ]

### साहित्याच्या अध्ययनाची एक नवी शाखा

एकोणिसाव्या शतकामध्ये युरोपच्या बाहेरच्या भल्या मोठ्या जगाची बौद्धिक जाणीव युरोपियन समाजाला झाली. त्यातून प्रथम एशिया, आफ्रिका, अमेरिका, ओशियानिया या इतर भूखंडांमधल्या भाषा, साहित्य-परंपरा, लोकश्रुती (फोकलोअर) विधिन्यायसंस्था, धर्मसंस्था, दृश्यकला इत्यादींचा जवळून परिचय करून घेण्याची प्रेरणा मिळाली. 'इंडॉलजी'चा विस्तार या प्रेरणेचेच उदाहरण आहे. ह्या प्रेरणेमुळे पुरेशी सामग्री उपलब्ध झाल्यावर साहजिक दुसरी तौलनिक अध्ययनाची प्रेरणा त्यातून उपस्थित झाली. तौलनिक भाषाविज्ञान, तौलनिक धर्मविद्या इत्यादी ज्ञानशाखा उदयाला आल्या. त्यांच्यापैकी साहित्याचा तौलनिक अभ्यास हे जरा धाकटे भावंड. त्याला 'तौलनिक साहित्य' असे इंग्रजीच्या धर्तीवरचे दिशाभूल करणारे नाव न देता प्रा. वसंत बापटांनी 'तौलनिक साहित्याभ्यास' असे थोडे बोजड वाटणारे पण अधिक नेमके नाव दिले हे योग्यच झाले. या नव्या ज्ञानशाखेची प्राथमिक ओळख करून द्यावी आणि पुढच्या भरीव अध्ययनाला वाचकाला उद्युक्त करावे या हेतूने हे छोटेखानी पुस्तक लिहायचे काम लेखकाकडून 'करवून घेणारे मुंबई विद्यापीठ' (पृ. १३) अभिनंदनास पात्र आहे.

'पूर्वसूत्र' आणि 'व्यवच्छेद आणि व्याख्या' ह्या प्रास्ताविक स्वरूपाच्या प्रकरणांनंतर 'राष्ट्रीय साहित्याची संकल्पना' 'आदान प्रदान आणि मध्यस्थी', 'अनुवादाचे प्रकार आणि महत्त्व' 'प्रभाव आणि प्रभव' (influonces आणि Sources, पृ. ७९) ही मुख्य विषयाच्या काही महत्त्वाच्या अंगांना स्पर्श करणारी प्रकरणे आली आहेत. शेवटी भारतीय अभ्यासकाला समोर ठेवून 'तौलनिक अभ्यासाचा भारतीय व्यूह' 'व्यक्तिविषयक [परिचय देणारी] सूची' आणि 'उपयुक्त संदर्भ-साहित्य' (इंग्रजी, मराठी, ग्रंथरूप, लेखरूप, वाङ्मयसूची, नियतकालिके) ही उपयुक्त सामग्री दिली आहे. सामान्य जिज्ञासू विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून मांडणी आणि भाषा सोपी ठेवली आहे. (क्वचित संस्कृतप्रेम जास्त झाले आहे– 'वर्गीकरण ..दिङ्मात्र केले तरी पुरे' पृ. ७६, 'महत्त्वपूर्ण भावात्मक सूचना' पृ. ८८– लेखकाला म्हणायचे आहे महत्त्वाच्या विधायक सूचना) परिभाषा परिचयसुलभ (estrangement दुरावा पृ. ६५) आणि लवचिक (archetype सनातन कल्पनारूप पृ. ७०, आदिम स्थिरपद कल्पना पृ. ७८) अशीच आहे. (क्वचित गडबड झाली आहे– मध्ययुगीन युरोपमधील प्रबोधनयुग Enlightonmont पृ. २; Enlightenment ही चळवळ अठराव्या शतकातील, मध्ययुगाच्या अखेरीस दिसतात त्या भावी 'रनेसांस'च्या पूर्वखुणा.) या सामान्य जिज्ञासू विद्यार्थी वाचकांपैकी काही या विद्याशाखेत रेंगाळणार या अपेक्षेने अधूनमधून काही उपयुक्त इशारे आणि सूचना दिल्या आहेत– दोन साहित्यांमधील साम्यभेदांची उपपत्ती देण्याचा प्रयत्न केला पाहिजे, त्यांना निव्वळ राष्ट्रीय वैशिष्ट्ये म्हणून थांबणे हा उथळपणा आहे (पृ. ३३ मॅक्स वेबरमधून तळटीप), भारतीय साहित्याच्या तौलनिक अभ्यासाची सुरवात अन्य क्षेत्रांशी साहित्याचा अनुबंध जोडत व्हावी, अगदी मार्क्सवादी समीक्षेच्या प्रकाशझोतात ती झाली तरी चालेल, सौंदर्यशोधन, रसोद्ग्राह, काव्यशास्त्राचे अनुसरण या अंगांनी तुलना व्हायची ती नंतर होऊ शकेल (पृ. ९२). इशारे व

सूचना यांच्याबरोबरच मराठी साहित्याभ्यासकांनी मनाची कवाडे उघडावी असे साने गुरुजी, रवींद्रनाथ ठाकुर, बुद्धदेव बसु यांच्या पावलांवर पाऊल ठेवून आंतरभारती आणि विश्वभारती या ध्येयांकडे जाण्याचे आवाहनही आहे.

या पुस्तकाला जिज्ञासू वाचक मिळोत आणि त्यांच्यामधून काही या नव्या ज्ञानशाखेकडे वळोत अशी इच्छा प्रकट करताना पुढच्या आवृत्तीच्या दृष्टीने एकदोन सूचना करणे अगत्याचे वाटते. पुस्तक परिचायक स्वरूपाचे असले तरी विषयाच्या दोन महत्त्वाच्या अंगांच्यावर प्रकरणे घालायला हवी होती– एक म्हणजे शार्ल बायी या फ्रेंच अभ्यासकाने चालना दिली ते शैलीचे तौलनिक अध्ययन (Comparative stylistics) आणि संस्कृत आणि पाश्चात्य काव्यशास्त्रांच्या तुलनेच्या निमित्ताने भारतातच ज्याची मुहूर्तमेढ रोवून झाली ते तौलनिक काव्यशास्त्र (Comparative poetics) (अर्थातच संदर्भसाहित्य सूचीतही दोन नवी दालने उघडावी लागतील.) दुसरी सूचना म्हणजे तौलनिक अभ्यासाचा वस्तुपाठ म्हणून दोन आटोपशीर साहित्यकृती किंवा उतारे घेऊन त्यांची तुलना साधर्म्य, वैधर्म्य, प्रभव, प्रभाव इत्यादी अंगाने करून दाखवणारे एखादे प्रकरण घालायला पाहिजे होते. (अर्थात दोन भाषांपैकी एक मराठी आणि दुसरी मराठी वाचकाला सामान्यतः परिचित वाटेल अशी दुसरी भाषा असेल हे ओघानेच आले.) असा वस्तुपाठ दिल्यामुळे पुस्तकातील विवेचनाचे पाय जमिनीवर टेकतील, अधरपणाचा धोका टळेल.

पुस्तकाला दुसऱ्या सुधारून वाढवलेल्या आवृत्तीचा सुयोग येवो ही इच्छा !

□

## : २ :

## माणूसनामा : न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी

**परीक्षण : गो. म. कुलकर्णी**

[ चेतश्री प्रकाशन, अमळनेर. मूल्य रु. ४० ]

'माणूसनामा' हा न्यायमूर्ती चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या लेखांचा संग्रह. १५० पृष्ठांच्या डेमी आकाराच्या या संग्रहात एकूण तेरा लेख आहेत. या संग्रहाला लाभलेली पद्मश्री पु. ल. देशपांडे यांची रसग्रहणात्मक प्रस्तावना, या संग्रहातील विचारांच्या आकलनाला– आस्वादनाला साह्य करते. ग्रंथग्रहणाची चौकट सिद्ध– करणे, हे प्रस्तावनाकाराचे कर्तव्य असते. ते प्रस्तुत प्रस्तावनेने समर्थपणे सिद्धीस नेलेले आहे.

या लेखसंग्रहातील काही लेखांचे मथळे पुढीलप्रमाणे आहेत : महात्मा गांधी कालबाह्य झालेत का? स्वातंत्र्य आणि जीवनमूल्य, श्रमप्रतिष्ठेची मूलतत्त्वे, अनासक्तियोग की विषादयोग? भ्रष्टाचाराचे तत्त्वज्ञान, लोकनीती व व कायद्याचे राज्य, स्त्रिया आणि कायद्याचे संरक्षण, महानगर : सामान्यांचे 'शरणतीर्थ', देव झोपला माणूस हरवला, भारतीय राष्ट्रीयत्व : वास्तव की आभास? लेखांचे हे केवळ मथळे वाचले तरी हा लेखसंग्रह आजच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक समस्यांशी संबंधित आहे, हे स्पष्ट होते.

आजच्या भारतीय जीवनातील विविध स्तरांवर जे प्रश्न उपस्थित झालेले आहेत, जी दुरावस्था निर्माण झालेली आहे, ती कोणताही आडपडदा न ठेवता स्पष्टपणे मांडणे आणि यावर कोणते उपाय करणे, इष्ट वा शक्य आहेत, हे पाहणे हे या लेखांचे प्रयोजन आहे. यात परोपदेशपर पांडित्य नाही तर तीव्रपणे आत्मनिरीक्षण करण्याचा आणि परखडपणे ते विचारार्थ इतरांसमोर मांडण्याचाही भाग आहे. या सर्वच लेखांतून न्या. धर्माधिकारी यांचा समाजाविषयीचा कळवळा, पोटतिडीक, न देखवे डोळा ही आकांताची वृत्ती प्रकट होते. 'आम्हांस आम्ही पुन्हा पहावे, काढुनि चष्मा डोळ्यांवर 'चा भाव प्रकट होतो.



अनुक्रमणिका






ही वृत्ती, हा भाव हा न्या. धर्माधिकारी यांना मिळालेला जन्मदत्त वारसा आहे. सुप्रसिद्ध गांधीवादी विचारवंत आचार्य दादा धर्माधिकारी यांचे हे सुपुत्र. दादांच्या आचारविचारांचे संस्कार बाळपणापासूनच त्यांच्यावर झालेले आहेत. बाळकडू मिळालेले आहे. न्या. धर्माधिकारी यांनी हे सारे आपल्या या पुस्तकाच्या प्रास्ताविकात कृतज्ञतापूर्वक नमूद केले आहे, एवढेच नव्हे तर त्यांनी हा लेखसंग्रह 'तख्त, तिजोरी, तलवार यांपासून अलिप्त राहून निखालस माणूस म्हणून जगणाऱ्या' आपल्या या पूज्य पित्यास अर्पण केलेला आहे. या लेखसंग्रहात दादा धर्माधिकारी यांच्या विचारांचे सादपडसाद वारंवार उमटताना दिसतात, त्याचे कारण हेच.

याचा अर्थ, न्या. धर्माधिकारी यांनी दादा धर्माधिकारी यांच्या विचारांचा आंधळा अनुवाद केला आहे, असे नव्हे. ग्रंथकाराचा मूलतःच गांधीवादाकडे ओढा आहे आणि या विचारांना ग्रंथकाराने स्वतःच्या दीर्घकालीन चिंतन - अवलोकनाची - अनुभवाची जोड दिली आहे. विशेष म्हणजे या विचारांना आधुनिक काळाचा संदर्भ आणि स्वतःचे असे एक अधिष्ठान आहे. न्या. धर्माधिकारी यांनी पूर्ववयात राष्ट्रीय चळवळीत उडी घेतली होती, कारावास भोगला आहे. ही बाब या संदर्भात लक्षात घेतल्यास येथील विचारांचा आविष्कार हे एका अनुभवसंपन्न विचारवंताच्या प्रचीतीचे बोलणे ठरते.

या संग्रहातील सारे लेख १९७९ ते १९८४ या काळात लिहिलेले आहेत. मुळात हे सारे लेखही नाहीत; लेखांच्या जोडीने त्यांनी या काळात भाषणे केली, परिसंवादात भाग घेतला, चर्चालेख लिहिले त्या सर्वांचे हे एकत्रिकरण आहे. १९८५ च्या गुढीपाडव्या-दिवशी हे प्रसिद्ध करण्यामागे लेखक आणि प्रकाशक यांचे एक उद्दिष्ट आहे. संयुक्त राष्ट्रसंघाने १९८५ हे 'आंतरराष्ट्रीय युवकवर्ष' म्हणून साजरे करण्याची घोषणा केली आहे. आजच्या तरुणपिढीला या निमित्ताने विचारप्रवण आणि कार्यप्रवृत्त बनवावे, चेतावणी द्यावी, हाक घालावी, या उद्देशाने हे विशिष्ट मुहूर्त साधून प्रकाशित केले आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीला तीन तपे होऊन गेली. आजची तरुण पिढी ही भारतीय स्वातंत्र्याच्या काळातच जन्माला आली, वाढली, मोठी झाली. या तरुण पिढीबद्दल आज पुष्कळदा तुच्छतेने लिहिले– बोलले जाते. पाश्चात्य देशातही जन्माला आलेला 'बिटनिक' संप्रदाय व त्याचा तेथील तरुणपिढीवर होणारा दुष्परिणाम, पाश्चात्य विचारवंतांच्या चर्चेचा, चिंतेचा विषय बनलेला आहे. पण व्यक्तिशः न्या. धर्माधिकारी या तरुणपिढीबद्दल निराश नाहीत. "का कोण जाणे, माझा परमेश्वरापेक्षाही आजच्या तरुणपिढीवर अधिक विश्वास आहे. माझ्या पिढीच्या मानाने आजची तरुणपिढी नुसती बहुश्रुत नाही, तर अधिक संवेदनशील आहे." असे उद्गार त्यांनी प्रास्ताविकात काढले आहेत. "जे मागच्या पिढीला किंवा माझ्या पिढीला जमले नाही, ते आजच्या तरूण पिढीला कदाचित जमू शकेल, अशी माझ्या मनात आशा आहे. या तरुण पिढीची आकांक्षा अंतरिक्षात प्रवास करण्याची आहे." असे गौरवोद्गार त्यांनी या संग्रहाच्या पृ. १५२ वर काढले आहेत. न्या. धर्माधिकारी किती आशेने, उत्साहाने, कौतुकाने आजच्या तरुणपिढीकडे पाहतात, याची यावरून कल्पना येते. मूलतः क्रांतीचा पाईक असलेला आजचा तरुण जर चुकीच्या दिशेने वाटचाल करीत असेल तर तो दोष त्याचा नसून त्याला संकुचित भाषिक, जातीय, व धार्मिक कारणासाठी विध्वंसक दिशेने नेणाऱ्या चळवळींचा आहे, असे ते म्हणतात (पृ. १५२) आजच्या तरुणवर्गाला लागलेली ही चुकीची दिशा दूर व्हावी, तो योग्य त्या दिशेने कार्यप्रवण व्हावा, संघटित व्हावा, हेच या संग्रहाचे प्रयोजन आहे. यासाठीच प्रस्तुत संग्रहात स्वातंत्र्योत्तर काळातील एकंदर स्थिती–गतीचा आढावा लेखकाने घेतला आहे. आजच्या दुरवस्थेचे दर्शन पुनः पुन्हा आणि निरनिराळ्या पातळ्यांवरून घडविले आहे. स्वातंत्र्य कल्पनेचा, लोकशाहीचा, समतेचा लोकनीतीचा भारतीय संविधानाचा अन्वयार्थ विशद करण्यावर भर दिला आहे.

'माणूसनामा' हे या लेखसंग्रहाचे नाव या दृष्टीने फार बोलके आहे. या 'माणूसनाम्या'च्या केंद्रस्थानी जो माणूस आहे, तो सर्वसामान्यांचे प्रतिनिधित्व करतो. या जनसामान्याच्या हितार्थ आणि सुखार्थच लोकशाहीची दृष्टी सर्वत्र फिरविली जाते. स्वतंत्र भारताच्या संविधानात जो उद्घोष आहे, तो या लोकशाहीच्या मूल्यांचाच. ही लोकशाहीची संकल्पना व्यवहार्य करणे हे स्वतंत्र भारताचे ध्येय आहे आणि स्वप्नही. या लोकशाहीच्या नावाने किंवा नावाखाली भारतीय माणूस अनेक व्यवहार करतो, पण खरोखर या लोकशाहीचा मतलब, तात्त्विक गाभा त्याला

आजपर्यंत योग्य त्या प्रकारे परिचितही झालेला नाही !

अशा परिस्थितीत ' लोकशाही ' कशाला म्हणतात ? स्वतंत्र भारताच्या संविधानाची पार्श्वभूमी कोणती ? अन्वयार्थ काय ? ही लोकशाहीची संकल्पना आजच्या भारतीय जीवनात कितपत कार्यान्वित झाली आहे ? कार्यान्वित झाली नसल्यास का नाही ? तसे होण्याच्या मार्गातील अडसर कोणते ? ते दूर करण्याचे उपाय काय ? यासारखे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न या संदर्भात निर्माण होतात. या प्रश्नांची उत्तरे काही प्रमाणात का होईना— शोधण्याच्या, समजून घेण्याच्या दृष्टीने न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी यांचा हा 'माणूसनामा' निश्चितच उपयोगी पडणारा आहे. उदाहरणार्थ, लोकशाहीच्या तदनुषंगिक लोकनीतीच्या अनुषंगाने आलेली या संग्रहातील पुढील काही विधाने पाहा :

' लोकशाही म्हणजे बहुसंख्येचे राज्य नव्हे ! बहुमतांचे राज्य हा व्यवहार आहे. परंतु व्यक्तीचे मूल्य आणि व्यक्तीची प्रतिष्ठा हा लोकशाहीचा प्राण आहे. व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा अगर मानवीय मूल्यांचा लोप बहुमताने सुद्धा करता येणार नाही, हे त्याचे मुख्य गमक आहे.' ' बहुमत म्हणजे लोकशाही नव्हे. आणि बहुसंख्येचे राज्य म्हणजेही लोकशाही नव्हे. अल्पमताचा मान राखला जाणार नसेल, तर अल्पसंख्यांकांना जगताच येणार नाही.' 'समाजवादाचे आर्थिक आणि सामाजिक समतेचे तत्त्व आणि लोकशाहीतील राजनैतिक स्वातंत्र्याचा सिद्धान्त यांचा मिलाफ म्हणजे लोकनीति. राजकीय समानतेच्या तत्त्वाला जर आर्थिक समतेचे अधिष्ठान नसेल, तर ती लोकशाही प्राणवान होऊ शकणार नाही.' (पृ. ५०, ५१) ' सर्वच नागरिक समान मानले जातील व सर्वांच्याच मतांचे मूल्यमापन राहील ' अशी ग्वाही देणाऱ्या आपल्या या संविधानाला उद्देशून न्या. धर्माधिकारी यांनी ' आध्यात्मिक ' असा शब्द वापरला आहे ( पृ. १३४ ) आणि हे अध्यात्म-कार्यकर न होण्याची कारणमीमांसाही केली आहे. भारतीय संविधानापुरताच विचार केला तरी या परिस्थितीला संविधानात ऐतिहासिक परिस्थितीमुळे काही तडजोडी, विसंगती पत्करात्व्या लागल्या आहेत. त्याचा हा परिणाम आहे असे जाणवते. ( याचा उल्लेख घटना परिषदेत डॉ. आंबेडकरांनीही केला होताच. ) भारतीय जीवनात स्वातंत्र्योत्तर काळात निर्माण झालेली दुही सत्तापिपासा, स्वार्थ, धर्म, भाषा, प्रांत इत्यादीत निर्माण केले गेलेले छेदभेद, एकांडे औद्योगीकरण, तीतून निर्माण झालेली अनेक स्तरांवरील विषमता, अज्ञान इत्यादी घटकही अर्थातच याला जबाबदार आहेतच. या साऱ्या वस्तुस्थितीचे विदारक दर्शन हा 'माणूसनामा ' घडवितो.

एखाद्या समाजस्थितीत जेव्हा बिघाड होतो, विकृती प्रमाणाबाहेर जाते, तेव्हा त्या त्या स्थितीचे केवळ अधांतरी दर्शन किंवा वर्णन देऊन प्रश्न संपत नाही; तिची कारणमीमांसा करणे, त्यातून बाहेर पडण्यासाठी मार्गदर्शन करणे, हेही विचारवंताचे कार्य असते. प्रस्तुत-संग्रहात ग्रंथकर्त्याने याही अंगाने काही विचार मांडले आहेत. परिवर्तनाचे बाह्य आणि आंतरिक असे भाग केल्यास लेखकाने बाह्य परिवर्तनाकडे लक्ष दिले आहेच, पण विशेष भर आहे तो आंतरिक बदलावर, हृदय-परिवर्तनावर. या दृष्टीने प्रस्तुत संग्रहात न्या. धर्माधिकारी यांनी गांधीविचारांचा केलेला ऊहापोह महत्त्वाचा आहे. या संग्रहातील तो गाभ्याचा भाग आहे.

एक कर्मकांड म्हणून स्वतंत्र भारतात महात्मा गांधींचा गुणगौरव करण्याचा, मानवंदना देण्याचा संकेत कटाक्षाने पाळला जातो. पण त्यांच्या विचारधनाकडे मात्र सोयीस्करपणे दुर्लक्ष केले जाते. महाराष्ट्रात तर गांधीजींच्या उदयापासूनच गांधीजींची उपेक्षा करण्याची वहिवाट चालू आहे. आजच्या सर्वसामान्य सुशिक्षित मराठी नागरिकाला व्यक्ती म्हणून गांधीजींबद्दल आदर वाटत असेलही, पण गांधीजींच्या तत्त्वज्ञानाबद्दल मात्र त्याला आस्था नाही. या तत्त्वज्ञानाला जुनाट, मध्ययुगीन मानणे, ही फॅशनच बनली आहे. अशा परिस्थितीत गांधीवादाबद्दलचे पूर्वग्रह दूर होण्याच्या दृष्टीने गांधीवादाचे मर्म व महत्त्व आजच्या वाढत्या विज्ञानयुगातही किती आहे, हे स्पष्ट होण्याच्या दृष्टीने हा ' माणूसनामा ' महत्त्वाचा आहे. गांधीविचारांचे हे समग्र दर्शन नव्हे, पण गांधीजींची ' रामराज्या 'ची कल्पना; शिक्षण-विषयक धारणा; श्रमविचार; चरखा, झाडू व सामूहिक प्रार्थनेच्या अवलंबामागील दृष्टी, सत्याग्रह व कायदेभंग यासारखे अन्यायविरोधी पवित्रे घेताना त्यांनी पाळावयास सांगितलेली पथ्ये, त्यांची कारणे समजून घेण्याच्या दृष्टीने हा संग्रह उद्बोधक आहे. या संग्रहातील पहिले चार लेख या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. शिवाजी विद्यापीठाच्या दीक्षान्त समारंभाच्या निमित्ताने केलेल्या भाषणातही गांधीविचारांचे विशेषतः त्यांच्या शैक्षणिक कल्पनांचे स्वरूप दिग्दर्शित झाले आहे.

न्या. धर्माधिकारी यांच्या जीवनदृष्टीवर जरी गांधीवादाचा पगडा असला तरी गांधीवादाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी सांप्रदायिक नाही. उदा. गांधीजी हे विकेंद्रीकरणाचे कट्टे पुरस्कर्ते होते. शहरांची भरमसाट वाढ त्यांना अमान्य होती. धर्माधिकारी यांनाही ती मान्य आहे, असे नव्हे. या स्थितीचे दुष्परिणाम त्यांच्या नजरेतून सुटलेले नाहीत; तथापि या शहरवाढीकडे पाहताना त्यांना असेही जाणवते की भारतातील विविध जातिजमाती एकत्र येण्याची शक्यता या महानगरांमुळेच निर्माण झाली आहे आणि या नगरांमुळेच अखिल भारतीयत्वाचा साक्षात्कार घडून येण्यास साह्य झाले आहे. ('महानगरे : सामान्यांचे शरणतीर्थ' हा लेख पहावा.)

न्या. धर्माधिकारी यांची धर्मविषयक किंवा स्त्रीविषयक मते त्यांच्या पुरोगामी, बुद्धिवादी वृत्तीची साक्ष देतात ('देव झोपला माणूस हरवला' आणि 'सतीत्व की मनुष्यत्व?' हे लेख पाहावेत). धर्माधिकारी यांना धर्माचे वावडे नाही; वावडे आहे ते धर्माच्या अंधअनुसरणाचे. म्हणून ते धर्मविषयक साऱ्या आचारविचारांचा कस पाहण्यासाठी त्याला शुद्ध नैतिकतेची कसोटी लावून पाहतात आणि या कसोटीच्या आधारे प्रचलित धर्मकल्पनेत शिरलेल्या विसंगतीचे, विषमतेचे विडंबनात्मक स्वरूप उघडे करतात. हाच परखडपणा व पुरोगामी वृत्ती त्यांच्या स्त्रीविषयक विचारातूनही प्रकट झालेली आहे. 'भ्रष्टाचाराचे तत्त्वज्ञान' शोधतांना ते भ्रष्टाचार प्रवृत्तीच्या मुळाशी जाण्याची कसोशी करतात आणि 'जन्माश्रित प्रतिष्ठा व संपत्ती मान्य असणाऱ्या संपत्ती-प्रधान व स्पर्धेवर आधारित जीवनप्रणालीचे भ्रष्टाचार हे अपत्य आहे' हे उघड करून दाखवितात. यावर उपाय म्हणून सामाजिक नीतिमूल्यांचा फेरविचार आणि भ्रष्टव्यक्तींविरुद्ध समाजाची सामूहिक व उग्र प्रतिक्रिया व्यक्त होण्याची गरज प्रतिपादतात. (पृ. ३७) त्यांच्या 'फाशी' या लेखातील गुन्हेगारीचे मूळ शोधण्याचा केलेला प्रयत्नही असाच सखोल आहे. 'सामाजिक, आर्थिक, धार्मिक व राजकीय असंतुलन व अन्याय यांची उत्पत्ती संपविल्याखेरीज खऱ्या अर्थाने गुन्हेगारीला आळा बसणार नाही (पृ. ८७) या त्यांच्या विधानाशी कोणीही सहमतच होईल.

याचा अर्थ, न्या. धर्माधिकारी यांनी 'माणूसनामा'त केलेली सर्व विधाने सर्वांना सारख्याच प्रमाणात मान्य होतील असे नाही; तशी अपेक्षाही नसते. उदाहरणार्थ, आपले सारे अध्यात्म हे जीवनाविषयीचे अज्ञान आणि मरणाची भीती यावर आधारलेले आहे, असे जेव्हा न्या. धर्माधिकारी म्हणतात, तेव्हा असा विचार मनात येतो की ऐतिहासिक दृष्ट्या हे सर्वच धर्मांबाबत खरे नाही का? यासाठी हिंदुधर्माला वेगळे काढण्याची गरज काय? धर्मप्रेरणा हा फार गुंतागुंतीचा विषय आहे, त्यात विविध प्रकारचे उलटसुलट घटक समाविष्ट झालेले आहेत. त्यांची विल्हेवाट सरसकटपणे एकाच पद्धतीने लावता येणार नाही. याचा अर्थ, न्या. धर्माधिकारी यांनी प्रचलित भारतीय धर्मव्यवहारातील अपप्रवृत्तीवर जे बोट ठेवले आहे ते चुकीचे आहे, असे होत नाही. मतभेदाची अशी आणखीही काही स्थळे नोंदविता येतील; पण त्यांच्या तपशिलात शिरण्याचे हे स्थळ नव्हे. येथे महत्त्व आहे ते विवेचनाच्या काटेकोरपणापेक्षा त्यामागील न्या. धर्माधिकारी यांच्या समाजहितैषी कळकळीच्या वृत्तीला, त्यामागील सहृदयतेला.

या ग्रंथाच्या शैलीबद्दलही हेच म्हणता येईल. येथील लेखांच्या मांडणीत विस्कळितपणा किंवा पाल्हाळ वारंवार डोकावतो. काही कल्पनांची, विचारांची, दृष्टान्तांची पुनरावृत्ती होते. याचे भान लेखकालाही आहे, या पुनरावृत्तीची किंवा पुनरुक्तीची कारणेही त्याने प्रस्तावनेत नमूद केलेली आहेत. ती समजून घेऊनही पुनरावृत्ती किंवा पाल्हाळ थोड्याशा श्रमाने निश्चितच दूर करता आला असता. मात्र या पाल्हाळातही एक रोचकत्व आहे, हे मान्य केलेच पाहिजे. विषय आकर्षक व रसाळ कसा करावा, श्रोतृसंवाद सहजपणे कसा साधावा याचे कसब न्या. धर्माधिकारी यांना चांगलेच अवगत झालेले आहे. त्यामधून त्यांच्या बहुश्रुततेचाही प्रत्यय येतो. दृष्टान्त, म्हणी आठवणी, आख्यायिका, कथा, दंतकथा, किस्से, सुभाषिते, कोटिक्रम, विनोद इत्यादींच्या पेरणीमुळे हे विवेचन वाचकाला सतत तल्लख ठेवते, आकृष्ट करते. 'आमच्या देशात माणसे शेजारी राहतात पण सोबत राहात नाहीत' 'सामुदायिक प्रार्थना म्हणजे दुसऱ्याच्या भल्यासाठी आत्म्याला केलेले आवाहन' 'समतेशिवाय संपन्नतेला अर्थ नाही' 'नागरिकाचा मताचा अधिकार ही खरेदीविक्रीची वस्तू नसून सतीचे वाण आहे' 'प्रस्थापितांना न्याय नकोच असतो, त्यांना हवा असतो,

त्यांच्यासारखा निकाल ' यासारखी कितीतरी अर्थगर्भ चमकदार वाक्ये या संग्रहातून काढून दाखविता येतील. ही वाक्ये वाचकांचे लक्ष चटकन् वेधून तर घेतात, पण त्यांचे अवधान जागे ठेवतात, त्याला अंतर्मुख बनवितात. इष्ट तो परिणाम साधतात. या दृष्टीने ही लेखनशैली यशस्वीच म्हणावी लागेल.

आधुनिक महाराष्ट्राच्या प्रबोधनयुगाचा प्रारंभ ब्रिटिश राजवटीपासून झाला. स्वातंत्र्यप्राप्तीबरोबर या प्रबोधनाचे एक पर्व समाप्त झाले. या प्रबोधनाला नवी दिशा व गती देण्याचे उत्तरदायित्व स्वातंत्र्योत्तर काळातील विचारवंतांकडे स्वाभाविकपणेच आले. पण हे इतिहासदत्त कार्य पार पाडण्यास आजचा विचारवंत अनेक कारणांनी अपुरा पडत आहे. या कार्याची व्याप्तीही पूर्वीच्या तुलनेने खूपच विस्तारली आहे; तीत अनेक प्रकारच्या गुंतागुंती व नागमोडी वळणे निर्माण झाली आहेत. अशा परिस्थितीत प्रत्येक विचारप्रवण व्यक्तीने आपल्यापरीने या विचारप्रक्रियेला विधायक गती देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ते त्याचे पवित्र कर्तव्य आहे. पण या दिशेने वाटचाल करणारी मंडळी हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीही दिसत नाहीत. अशा परिस्थितीत न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी यांनी आजच्या तरुण पिढीला उद्बोधित करण्यासाठी प्रवृत्त व्हावे, आपल्याजवळचे विचारधन मुक्त मनाने उघडे करावे; ही घटना दिलासा देणारी नव्हे काय? महाराष्ट्राच्या मध्यवर्ती केंद्रापासून दूर असलेल्या चेतश्री प्रकाशन-सारख्या नवोदित प्रकाशनसंस्थेने हे विचारधन प्रकाशित करण्यासाठी पुढे यावे. ही घटनाही बोलकी आहे. नवोदित ज्ञानाचे झरे व झिरपे महाराष्ट्रात दूरवर पसरण्याच्या दृष्टीने तर तिचे महत्त्व विशेषच जाणवते. या ' माणूसनाम्या 'चे परिवर्तन ' रोजनाम्यात 'त होण्याची शक्यता या प्रकारच्या उपक्रमांतूनच संभवणार आहे. ग्रंथकार आणि प्रकाशक यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

□

## : ३ :

## लागीर : म. गो. पाठक

**परीक्षण : म. ना. अदवन्त**

[ उत्कर्ष प्रकाशन, पुणे ४. मूल्य २५ रुपये ]

' लागीर ' हा म. गो. पाठक यांच्या ग्रामीण कथांचा संग्रह. मराठीतील ग्रामीण कथा आजवर अनेक वळणे घेत आली आहे. अद्‌भुतरम्यतेपासून ते प्रखर वास्तवा-पर्यंत अनेक अंगांनी ती विकसित झाली आहे. खेड्यातील अज्ञान, दैन्य, दारिद्र्य यांचे पारंपारिक चित्रण तरी त्यातून येते किंवा त्यातील अद्‌भुत रंगविण्याच्या भरात ती कल्पनारम्यतेच्या पातळीवर तरी जाते. म. गो. पाठक यांच्या कथांतून दोन्ही प्रवृत्तींचा संगम झालेला आढळतो. त्यात वास्तवाची जाण आहे व कल्पनारम्य-तेची पण ओढ आहे. त्यामुळे त्यांच्या कथा एका वेगळ्या प्रकृतीच्या वाटतात.

त्यांच्या कथा वाचत असताना प्रथमच एक गोष्ट जाणवते. की त्यांची कथा ' मनोरंजना 'च्या काळाशी नाते सांगणारी आहे. ' मनोरंजन ' काळातील गुर्जरपद्धतीच्या गोष्टीप्रमाणे त्यांच्या कथेचा घाट असतो. त्यात संपूर्ण बारीकसारीक तपशील देण्याचा हव्यास आहे. कथेमध्ये रहस्य निर्माण करून वाचकांना शेवटी आकस्मिक विस्मयाचा धक्का देणारे तंत्र आहे व मनोरंजन काळा-प्रमाणे कथेचा शेवट उद्‌बोधक व वाचकांना हवाहवासा करण्याचे कौशल्य त्यात आहे. त्यामुळे त्यांची कथा अनेकदा पसरट होते आणि वास्तवापेक्षा चमत्कृतीचा व योगायोगाचा ती आश्रय घेते.

त्यांची ' पाळणा ' ही पहिलीच कथा पहा. त्याची सुरुवातच ' संशयाचं पिशाच्च मोठं खवीस. ते एकदा मानगुटीवर बसलं की मान मोडल्याशिवाय ते सोडत नाही, ' अशा सैद्धान्तिक वाक्याने केली आहे. त्या सिद्धा-न्ताच्या स्पष्टीकरणार्थ साधू शिंप्याच्या मनात ते पिशाच्च कसे शिरले— आपल्या पत्नीबद्दल त्याच्या मनात संशय

कसा निर्माण झाला व योगायोगाने त्या संशयाचे निरसन होऊन शेवट कसा गोड झाला याची कथा येते. साधूच्या मनात संशयाचे पिशाच्च निर्माण करण्यासाठी त्याच्या व पवित्राच्या जीवनात सोपाना येतो. गुर्जरांच्या कथेप्रमाणेच या कथेत गैरसमजाचे वादळ आहे व ते दूर करण्यासाठी शेवटचा कल्पनारम्य प्रसंग पण त्यात आणला आहे. प्रसंगांचा भरपूर तपशील पण त्यात येतो. पण तरीही कथा ग्रामीण पार्श्वभूमीवर रंगवल्यामुळे व साधूच्या मनोव्यापाराच्या चित्रणामुळे चटकदार व रंजक बनते.

कथानकात संपूर्ण तपशील देण्याची त्यांची पद्धती जुन्या वळणाची असली तरी कुठेही ती रसापकर्षक होत नाही. 'नाना मास्तर' या कथेत असाच तपशील आला आहे. 'नाना मास्तर औंधाला राहून कळंबची शाळा करत होता- आपली सहा पोरं आणि बायको एवढा पसारा घेऊन तो गुरव आळींत एका चार खणी माळींत राहात होता.' अशी कथेच्या सुरुवातीला नाना मास्तरची ओळख करून देऊन त्याच्या दैनंदिन जीवनाचा तपशील त्यांनी आणला आहे. तो तपशील वास्तव आहे. नाना मास्तराच्या दारिद्र्याचे, त्याच्या घरी-दारी होणाऱ्या उपेक्षेचे चित्र तो तपशील चांगला रंगवते. पण शेवटी त्यात दरोडेखोर आणून आणि त्याच्याकरवी नाना मास्तरला द्रव्यप्राप्ती करून देऊन कथा गुर्जरी पद्धतीने त्यांनी संपविली आहे. सुदैवाने त्यांचा दरोडेखोर प्रामाणिक आहे. चोरून सोने गाळणारा सोनारही प्रामाणिक आहे. त्यामुळे नाना मास्तरांच्या कपाळीचे दारिद्र्य व त्याची होणारी उपेक्षा संपते व कथेचा शेवट गोड होतो.

'तिजोरी' या कथेतही असेच रहस्य येते. मात्र ही कथा मानवी स्वभावावर अतिशय चांगला प्रकाश पाडते. आबासाहेब पानसे रिटायर्ड मामलेदार यांच्या जीवनाची ही कथा. चार मुले व चार मुली– साऱ्यांचा संसार सुखाचा– पंधरा नातवंडे व चार पंतवंडे असा वंशवृक्षाचा पसारा– असे त्यांचे सुखी जीवन. पण कथा शेवटी 'तिजोरी'भोवती घोटाळते. या तिजोरीत काय आहे ते त्यांच्याशिवाय व त्यांची पत्नी राधाबाई यांच्याशिवाय कुणाला माहीत नाही. त्यात अमाप द्रव्य असेल या कल्पनेने त्यांच्या तीनही मुलांचा त्या तिजोरीवर डोळा. या साऱ्याचे चित्रण लेखकाने अतिशय प्रत्ययकारी पद्धतीने केले आहे. 'तिजोरीचे गूढ' हा कथेचा केंद्रबिंदू व त्यावर स्वार्थ बुद्धीने नजर ठेवणारे त्यांचे तीन कर्ते पुत्र हा कथेचा मुख्य विषय. त्यांनी तो अतिशय समर्थपणे हाताळला आहे. मात्र शेवटी आबाचा अकस्मिक मृत्यू, मुलांचा तिजोरीबद्दल झालेला भ्रमनिरास व त्यांच्या आईने त्यांना शिकवलेला धडा यातून कथा शेवटी आकस्मिक वेगळे वळण घेते. हेही वळण शेवटी गुर्जरांच्या कथेच्या पद्धतीचे वाटते.

त्यांच्या सर्वच कथांचा या पद्धतीने विचार करता येईल. पण त्यामुळे त्यांची कथा जुनाट वाटत नाही. याचे कारण अभिव्यक्तीची त्यांची पद्धती जुनी असली तरी त्यातील आशय नवा आहे. आजच्या ग्रामीण जीवनाच्या पार्श्वभूमीवर त्यांची कथा उभी राहिलेली आहे. (गुर्जरांच्या कथेत पांढरपेशा मध्यमवर्गच प्रामुख्याने येत होता.) बदलत्या ग्रामीण जीवनाचे चित्रण करत असताना त्यांनी अनेक कथांतून नवा तपशील पुरवला आहे. त्यामध्ये येणाऱ्या व्यक्तिरेखासुद्धा त्यांनी या नव्या पार्श्वभूमीवर उभ्या केल्या असल्याने त्या तशा ठसठशीत व प्रत्ययकारी वाटतात. गुर्जरांच्या कथेचे बाह्य वळण त्यांनी स्वीकारले असले तरी एका बाबतीत त्यांची कथा गुर्जरांच्या कथेपेक्षा वेगळी आहे. गुर्जरांची कथा घटनांना प्राधान्य देते तर यांची कथा ही कोणातरी माणसाची गोष्ट सांगते– त्याच्या जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न करते. क्वचित् त्यातून काही सामाजिक प्रश्न उभा करण्याचे कार्यही ती करते. 'नाम्याचं इमान' मधील राजनिष्ठ नाम्या, 'बदली' मधील शिक्षिका साळुंकीबाई, तिच्यावर नजर ठेवणारा किसनराव व तिला पाठीशी घालणारा सोनार मास्तर, 'जेव्हा सगळ्या वाटा बंद होतात' या कथेतील एकनाथ नरहर देशपांडे आणि 'लागीर' मधील देवदेवस्की करणारा नामू कैकाड्या–या साऱ्याच व्यक्तिरेखा आगळ्या वाटतात. त्यांच्या प्रत्येकाच्या जीवनात येणारे प्रश्न जुने असले तरी ते नव्या पद्धतीने पाठकांनी रंगविले आहेत. 'रखवालदार'मधील आपल्या मालकिणीला ज्या खड्यात पुरले त्या खड्यावर राखण करत बसलेला कुत्रा तर एक वेगळीच दाद घेऊन जातो. या सर्व कथांतून खेड्यातील जीवनातून आढळणारे अनेक प्रश्न येतात. त्यात गुंडगिरी आहे, स्वार्थासाठी किंवा सूडासाठी केलेले खून आहेत, देवदेवस्की आहे, आणि प्रामाणिकपणे जगणारे सज्जन पण आहेत. त्यामुळे त्यांच्या कथा जुन्या वळणाने जात असल्या तरी त्यातील आशयाच्या वेगळेपणामुळे त्या आकर्षक वाटतात, रंजक वाटतात. त्यांच्या कथेला लाभलेली

ग्रामीण पार्श्वभूमी हेही त्याचे कारण असू शकेल.

म. गो. पाठक यांच्या या कथांनी ग्रामीण कथेत किती भर घातली हा प्रश्न विवाद्य ठरेल—तिच्या अभिव्यक्तीच्या जुन्या पद्धतीमुळे मराठी कथेत तिने नवे प्रयोग केले का—हाही प्रश्न विवाद्य ठरेल. पण त्यांची कथा रंजक वाटते, वाचनीय वाटते व उद्बोधन करणे हा कथेचा धर्म असेल तर अनेक ठिकाणी माणसांचे वेगवेगळे स्वभाव व त्यातून निर्माण होणारे प्रश्न रंगवून ती उद्बोधनही करते. ग्रामीण जीवनातील वास्तव आणि कल्पनारम्यता याचा त्यांच्या कथेत झालेला समन्वयही त्यांच्या कथेला वेगळे परिमाण देतो हेच 'लागीर' या कथासंग्रहाचे यश व याच त्यांच्या कथाच्या मर्यादा. ☐

# ग्रंथ-परिचय

## बकुळीची फुले
### प्र. श्री. नेरुरकर

[ चिंतामणी साहित्य सहयोग प्रकाशन, कुडाळ. रु. १५ ]

श्री. प्र. श्री. नेरुरकर यांचा हा ललित लेखांचा संग्रह. हे ललितलेख स्मृतिस्वरूपाचे आहेत. आपल्या वयाच्या एकविसाव्या वर्षापर्यंतच्या आठवणी यातील तीस लघुलेखात त्यांनी सांगितलेल्या आहेत. त्यातील पहिल्या वीस आठवणी त्यांच्या बेळगावमधील वास्तव्या-वर आधारलेल्या आहेत. बेळगावमधील बेननस्मिथ हायस्कूल व लिंगराज कॉलेज यासंबंधीच्या त्यांच्या आठवणी हृद्य वाटतात. त्या संस्थेमधील अनेक शिक्षक व प्राध्यापकांचा त्यांच्यावर झालेला संस्कार–या संस्थां-बद्दल व एकंदर बेळगावाबद्दल त्यांना वाटणारा जिव्हाळा–या आठवणीतून चांगला प्रगट होतो. त्या-नंतरच्या त्यांच्या आठवणी बालपणच्या आहेत. पुणे आणि नेरूर याठिकाणी त्यांचे गेलेले बालपण त्यांनी स्मृतिरूपाने साकार केले आहे. प्रथम बेळगाव व नंतर नेरूर असा उलटा क्रम त्यांनी का घेतला हे मात्र समजत नाही. नेरूरकर चांगले कथालेखक आहेत. त्यामुळे त्यांच्या या स्मृती नाट्यपूर्ण व रंजक वाटतात, त्यांच्या व्यक्तित्वाचे दर्शन घडवतात.

## साक्ष इतिहासाची
### अ. वा. वर्टी

[ श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. रु. २७·५० ]

'साक्ष इतिहासाची' या पुस्तकात डॉ. अ. वा. वर्टी यांनी महाराष्ट्रात व भारतात घडलेल्या काही प्रसंगांची नोंद केली आहे. त्या नोंदीत तशी काही पद्धत नाही. प्रासंगिक स्वरूपाच्या या नोंदी असाव्यात. त्यातील काही नोंदी सामाजिक स्वरूपाच्या आहेत– काही ऐतिहासिक स्वरूपाच्या. 'शंभर वर्षांपूर्वी एक गाजलेले प्रहसन : मोर एल एल बी.' ही रंगभूमीविषयक नोंद आहे तर 'दोनशे वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रात' 'नाशिकातील ख्रिस्तीकरण' 'मिशनऱ्यांची चिकाटी–ब्राह्मणाचा विरोध' 'देशी धर्मप्रसारकांना खास शिक्षण' अशा काही नोंदी सामाजिक स्वरूपाच्या आहेत. 'सोमनाथ व महमूद' 'अहमदशहा दुराणी' या दोन नोंदी ऐतिहासिक स्वरूपाच्या आहेत. या सर्व नोंदींतून तसे काही सूत्र दिसत नसले तरी त्या त्या विषयाची त्यात आलेली माहिती मनोरंजक व उद्‌बोधक आहे. त्यामुळे पुस्तक वाचनीय झाले आहे. या ग्रंथाची हीच फलश्रुती.

## काही सोनेरी काही चंदेरी
### श्यामकांत गोखले

[ श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. रु. २५ ]

श्री. श्यामकांत गोखले यांच्या जीवनातील सुखद आठवणींचा हा संग्रह. ही स्मृतिचित्रे अत्यंत बोलकी व अत्यंत लालित्यपूर्ण रीतीने रंगविलेली आहेत. त्यात बहुतेक व्यक्तिरेखाच आहेत– पण त्यांच्या जीवनात त्या त्या व्यक्तींनी जे काही सोनेरी वा चंदेरी क्षण निर्माण केले त्यांचे चित्रण श्यामकांत गोखले यांनी अत्यंत जिव्हाळ्याने केले आहे. त्यात त्यांचे वडील आहेत, सिमल्याचा फुगेवाला आहे, पठाणकोटचा बस ड्रायव्हर आहे– हिथरो एअरपोर्टचा बस ड्रायव्हर आहे आणि त्याचबरोबर काकासाहेब गाडगीळ, चक्रवर्ती राज-गोपाळाचारी, लालबहादूर शास्त्री या सारख्या राज-कारणी व्यक्ती पण आहेत. साहित्याच्या क्षेत्रातील पु. ल. व गदिमा आहेत तर कलेच्या क्षेत्रातील निरखवां खांसाहेब, बालगंधर्व, गणपतराव देवासकर अशासारखे कलावंतही आहेत. या सर्व व्यक्तींच्या सहवासात आलेले अमृतक्षण त्यांनी या संग्रहात टिपलेले आहेत. परंपरागत व्यक्तिचित्रणापेक्षा आत्मनिष्ठ भूमिकेतून या रंगविलेल्या व्यक्तिरेखा आकर्षक तर वाटतातच, पण त्यांच्या पाठी-मागे असलेले लेखकाचे व्यक्तिमत्व लोभस वाटते.

## ग्रंथ पारितोषिकांसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत पुढील साहित्य प्रकारातील १९८५ सालात प्रसिद्ध झालेल्या उत्कृष्ट ग्रंथांना पारितोषिके देण्यात येतील.

**कविता :**
कै. ह. स. गोखले स्मृत्यर्थ २०० रु.

**उत्कृष्ट प्रकाशन :**
कै. अ. स. गोखले स्मृत्यर्थ २०० रु.

**कादंबरी :**
कै. ह. ना. आपटे स्मृत्यर्थ १०१ रु.

**संपादित ग्रंथ :**
कै. गिरिजा गंगाधर जांभेकर स्मृत्यर्थ १०१ रु.

**समीक्षा :**
प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचे नावे रु. ५००

**संत वाङ्मय :**
तुळशीराम वाघ यांचे स्मृत्यर्थ रु. ३००

**कुमार वाङ्मय :**
सुशील प्रधान स्मृत्यर्थ २०० रु.

**ललितेतर वैचारिक ग्रंथासाठी :**
कै. शि. म. परांजपे, कै. ना. गो. चापेकर, कै. विश्वनाथ – पार्वती गोखले यांचे स्मृत्यर्थ प्रत्येकी रु. २५०, २५० व १५० रु.

श्रीगणेश – सरस्वती ठाकूरदेसाई यांचे स्मृत्यर्थ रु. ५०१ व रु. ४०१ अशी दोन पारितोषिके **ललितेतर वैचारिक ग्रंथांसाठी** यंदा देण्यात येणार आहेत.

याशिवाय कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत **कुसुमाग्रज पारितोषिक** आणि कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत **चिं. वि. जोशी पारितोषिक** अशी दोन पारितोषिके एका **कवीला** आणि एका **विनोदी लेखकाला** देण्यात येतील. ही पारितोषिके प्रत्येकी रु. १२००|–ची असतील. शिवाय या पारितोषिकप्राप्त ग्रंथांच्या प्रकाशकांना प्रत्येकी रु. ९००|– चे पारितोषिक देण्यात येईल.

वरील सर्व पारितोषिकांसाठी १ जानेवारी १९८५ ते ३१ डिसेंबर १९८५ या कालावधीत प्रकाशित झालेले ग्रंथ विचारात घेतले जातील.

ज्या लेखक–प्रकाशकांना वरील पारितोषिकांसाठी ग्रंथ सादर करावयाचे असतील त्यांनी ग्रंथाच्या किमान दोन प्रती कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ३० या पत्त्यावर उशीरात उशीरा ३१ जानेवारी १९८६ अखेर पावेतो पोचत्या कराव्या ही विनंती.

राजा फडणीस
कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद.





# परिषद-वार्ता

(१ जुलै ते ३१ ऑगस्ट १९८५ अखेर)

## कार्यकारी-मंडळ सभा

दिनांक १ जुलै १९८५ रोजी नवनिर्वाचित कार्यकारी-मंडळाने कारभाराची सूत्रे हाती घेतली. या मंडळाची पहिली सभा दिनांक ७ जुलै १९८५ रोजी झाली.

या सभेत पुढील महत्वाचे निर्णय घेण्यात आले : १) १९८५-८८ करिता पदाधिकारी आणि विविध समित्यांची निवड करण्यात आली. २) परिषदेच्या वर्धापन दिनी (२७ मे) दरवर्षी, सर्वोत्कृष्ट वाङ्मयीन कामगिरीबद्दल एका साहित्यिकास 'महाराष्ट्र साहित्य परिषद' पारितोषिक देण्यात यावे. हे पारितोषिक रोख रु. २०००/- आणि मानचिन्ह या स्वरूपात सभारंभपूर्वक देण्यात येणार आहे. या योजनेतील पहिले पारितोषिक २७ मे १९८६ रोजी देण्यात येईल. ३) मध्यंतरी खंडित झालेले विभागीय साहित्य-संमेलन या वर्षापासून नियमित घेण्यात येणार आहे. ४) दरवर्षी साहित्य परिषदेच्या सर्व शाखांचे पदाधिकारी व म. सा. प. चे पदाधिकारी यांची संयुक्त बैठक घेण्यात येईल.

## शाखा पदाधिकाऱ्यांची पहिली सभा

नवनिर्वाचित कार्यकारी मंडळाने ठरविल्याप्रमाणे शाखा पदाधिकाऱ्यांची पहिली सभा १८ ऑगस्ट १९८५ रोजी घेण्यात आली. या सभेस श्री. राजेंद्र बनहट्टी, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. राजा फडणीस, श्री. म. वि. गोखले (पुणे) हे साहित्य परिषदेचे पदाधिकारी आणि सर्वश्री संजय होगाडे, श्रीकांत भिडे, (इचलकरंजी) श्री. मधुसूदन नेने (वाई) म. पां. भावे, पद्माकर शिरवाडकर (ठाणे) प्रभाकर चौधरी, (जळगाव) दिलीप कुलकर्णी (नंदुरबार) रा. व्यं. छत्रपती (सोलापूर) श्री. गं वागूल (कोपरगाव) सूर्यकांत सरकर, वि. ग. घोलप (येवला) सुमती लांडे (श्रीरामपूर) कुसुमाकर शिंपी (धुळे) मोहन कुलकर्णी, (कराड) किशोर पाठक (नाशिक) अरुण शेवते (अहमदनगर) ना. ज. जाईल (डोंबिवली) अ. द. नीलकंठ (कामेरी) संभाजीराव पाटणे (सातारा) कोर नथू महादेव आणि भास्कर सोनावणे (साक्री) हे शाखांचे प्रतिनिधी उपस्थित होते. शाखांसाठी सर्वानुमते एक नियमावली संमत करण्यात आली व शाखांच्या सर्व अडचणी/अपेक्षा/सूचना यांच्यावर सर्वांगीण चर्चा होऊन काही महत्त्वाचे निर्णय एकमताने घेण्यात आले. दरवर्षी शाखांच्या कार्याचा आढावा घेऊन सर्वोत्कृष्ट शाखेस रोख रु. ५००/चे पारितोषिक व कराडकरांच्या वतीने कै. यशवंतराव चव्हाण फिरता चषक देण्यात येणार आहे. शाखांच्या कामात एकसूत्रता यावी म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यक्षेत्राचे पुढीलप्रमाणे विभाग पाडून, शाखांच्या मार्गदर्शनासाठी एकेक पालक प्रतिनिधी नेमण्यात आला आहे. (१) सातारा, सांगली, कोल्हापूर - श्री. म. वि. गोखले (२) रत्नागिरी, सिंधुदुर्ग, ठाणे, रायगड- श्री. प्रभाकर अत्रे, (३) नगर, नाशिक- श्री. वसंत स. जोशी (४) धुळे जळगाव-श्री. राजा फडणीस (५) सोलापूर- श्री. म. श्री. दीक्षित.

सभेस उपस्थित असलेल्या शाखांच्या सर्व प्रतिनिधींनी वरील उपक्रमाचे स्वागत करून दरवर्षी अशी सभा भरविण्यात यावी, असे आवाहन केले.

## देणग्या :

कै. कुमुदिनी दत्तप्रसन्न काटदरे यांनी, कै. वा. म. जोशी वाङ्मय पुरस्कारासाठी, मृत्युपत्रान्वये रु. १०,०००ची देणगी दिली आहे.

कै. म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचे स्मृत्यर्थ दरवर्षी कार्यक्रम करण्यासाठी श्री. वि. शं. पुरोहित (रु. १००१) लो. टिळक पर्स फंड ट्रस्ट (रु. १००) श्री. बबनराव नावडीकर (रु. १०१) श्री. गो. प. नेने (रु. १०१) श्री. ग. वा. करमरकर (रु. १०१) श्री. प्रकाश शुक्र (रु. १०१) श्री. अरविंद नी. नवरे (रु. ५१) यांनी देणग्या दिल्या आहेत. या कामी ५००१ रु. चा निधी जमविण्याचा संकल्प आहे.

वरील सर्व देणगीदारांची परिषद ऋणी आहे.

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :

**कै. र. वा. दिघे स्मृतिदिन** : दि. ५ जुलै ८५ रोजी कै. दिघे स्मृतिदिनानिमित्त डॉ. सुप्रिया अत्रे यांचे 'र. वा. दिघे यांच्या कादंबऱ्या' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. वामन मल्हार जोशी स्मृतिदिन** : दि. २० जुलै ८५ रोजी कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त डॉ. लीला दीक्षित यांचे 'मराठीतील काही पत्रात्मक कादंबऱ्या' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन** : दि. २२ जुलै ८५ रोजी, परिषदेचे माजी पदाधिकारी व लेखक कै. ग. ल. ठोकळ यांच्या प्रथम स्मृतिदिनाचा कार्यक्रम करण्यात आला. या प्रसंगी डॉ. अनुराधा पोतदार यांचे 'मराठीतील ग्रामीण कविता' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. पु. भा भावे स्मृतिदिन** : दि. १२ ऑगस्ट रोजी कै. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. व. कृ. वऱ्हाडपांडे (नागपूर) यांचे 'भावे साहित्याचे आक्षेपक व वस्तुस्थिती' या विषयावर व्याख्यान झाले. पुणे विद्यापीठाच्या एम. ए.च्या परीक्षेत मराठी विषयात प्रथम क्रमांक मिळविणाऱ्या वृन्दा भार्गवे यांना या प्रसंगी अध्यक्षांचे हस्ते कै. पु. भा. भावे पारितोषिक देण्यात आले.

**चर्चा** : श्री. व्यंकटेश माडगुळकर यांच्या सत्तांतर या कादंबरीच्या निमित्ताने दि. २१।८।८५ रोजी चर्चेचा कार्यक्रम आयोजित केला होता. 'वाङ्मयनिर्मिती व वाङ्मयचौर्य : सत्तांतरच्या निमित्ताने' या विषयावर चर्चा झाली. डॉ. आनंद यादव व डॉ. व दि. कुलकर्णी यांनी चर्चेत भाग घेतला. प्रा. गो. म. कुलकर्णी अध्यक्षस्थानी होते.

**बालकवी स्मृतिदिन** : कै. बालकवी (त्र्यंबक बापूजी ठोंबरे) यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ दि. २८ व २९ ऑगस्ट रोजी डॉ. स. गं. मालशे (मुंबई) यांची 'मराठी काव्यातील विनोद' या विषयावर दोन व्याख्याने झाली.

## शाखा वृत्त :

**अहमदनगर** : २० जुलै १९८५ रोजी अहमदनगर शाखेची सर्वसाधारण सभा होऊन त्यात ८५–८८ या वर्षासाठी पुढील कार्यकारिणी निवडून आली. **अध्यक्ष** : डॉ. ह. कि. तोडमल, **उपाध्यक्ष** : श्री. भास्करराव जाधव, श्री. मु. म. कोटस्थाने, श्री. धों. ग. वडझीरकर, **कार्याध्यक्ष** : श्री. अरुण शेवते, **कार्यवाह** : श्री. चंद्रकांत पालवे, श्री. विष्णु बोरकर व सौ. गीता पुंड. दिनांक २२।७।८५ रोजी कै. ग. ल. ठोकळ यांच्या प्रथम स्मृतिदिनाचा कार्यक्रम करण्यात आला. याप्रसंगी डॉ. आनंद यादव यांचे व्याख्यान झाले.

**जळगाव** : २८।७।८५ रोजी जळगाव शाखेची सर्वसाधारण सभा होऊन त्या सभेत १९८५–८८ या वर्षासाठी पुढील पदाधिकारी निवडण्यात आले. **अध्यक्ष**– श्री. भागवतराव चौधरी, **उपाध्यक्ष**– श्री. ना. चिं. शिरसाळे, **कोषाध्यक्ष**– श्री. इंदिराबाई पाटील, **कार्याध्यक्ष**– श्री. प्र. म. चौधरी, **कार्यवाह**– श्री. हो. प. चौधरी.

पुणे, २५ ऑगस्ट १९८५

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**
कार्यवाह

( सभासदांसाठी )

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# वार्षिक साधारण सभा

## — सूचना —

टिळक रस्ता, पुणे ३०.
दि. ५ सप्टेंबर, १९८५

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २९ सप्टेंबर १९८५ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४–३० वाजता भरणार आहे. या सभेला सर्वांनी उपस्थित राहून सहकार्य करावे अशी विनंती आहे. या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

**– कामे –**

( १ ) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.
( २ ) श्रद्धांजली.
( ३ ) १९८४–८५ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
( ४ ) १९८४–८५ चे उत्पन्न-खर्च-पत्रक आणि ताळेबंद-पत्रक संमत करणे.
( ५ ) १९८५–८६ चा अर्थसंकल्प संमत करणे.
( ६ ) १९८५–८६ करिता हिशेब तपासनीसांची नेमणूक करणे.
( ७ ) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

आपले,

| | | |
|---|---|---|
| शंकर पाटील<br>( अध्यक्ष ) | राजेन्द्र बनहट्टी<br>( कार्याध्यक्ष ) | म. श्री. दीक्षित<br>( कोषाध्यक्ष ) |
| राजा फडणीस | म. वि. गोखले<br>( कार्यवाह ) | प्रभाकर अत्रे |

---

**टीप**

( १ ) गणसंख्येच्या अभावी सभा १५ मिनिटे स्थगित होईल व नंतर रीतसर सुरू होईल.

( २ ) वरील कामकाजासंबंधी मतदार-सभासदास काही विशेष सूचना करावयाच्या असतील अगर ठराव मांडावयाचा असेल तर लेखी स्वरूपात तसे २० सप्टेंबर ८५ पर्यंत कळवावे.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

वर्ष ७९ वे, नोंदणी क्र. ४१९

# वार्षिक कार्यवृत्त : १९८४–८५

**१ जुलै १९८४ ते ३० जून १९८५ अखेर**

म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या तिसऱ्या-शेवटच्या कार्याचे वेचक वृत्त सभासदांना सादर करीत आहोत.

**सभासद संख्या :**

वर्षारंभी (१ जुलै) वार्षिक साधारण ३३४५ आणि आजीव १६५३ मिळून एकूण ४९९८ सभासद होते. वर्षभरात साधारण २९४ आणि आजीव १७० सभासदांची भर पडल्यामुळे जून ८५ अखेर साधारण ३६३९ आणि आजीव १८२३ अशी एकूण ५४६२ संख्या झाली. (सुमारे १००० साधारण सभासदांकडून वर्गणी येणे आहे.)

**साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :**

वर्षभरात पुणे येथे सरासरी दरमहा व्याख्यानादी तीन कार्यक्रम झाले. (शाखांतर्फे परगावी झालेले अन्यत्र दिले आहेत.) ५ जुलै, र. वा. दिघे स्मृत्यर्थ प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे 'ग्रामीण साहित्याची वाटचाल' या विषयावर व्याख्यान. ९ जुलै, श्री. श्रीराम साठे आणि त्यांचे सहकारी यांचा अभंग गायनाचा कार्यक्रम. २० जुलै, वा. म. जोशी स्मृत्यर्थ डॉ. ललिता कुंभोजकर यांचे 'दलित कवितेचे आव्हान' या विषयावर व्याख्यान. १८ ऑगस्ट, श्रीमती सावित्रीबाई बारलिंगे यांचे स्मृत्यर्थ श्रीमती निर्मला देशपांडे यांचे 'स्त्रिया आणि दलितांचे प्रश्न' या विषयावर व्याख्यान २८ ऑगस्ट, पु. भा. भावे स्मृत्यर्थ प्राचार्य राम शेवाळकर यांचे 'प्रकाशपुत्र भावे' या विषयावर व्याख्यान आणि त्यांचे हस्ते (भावे स्मृति समितीतर्फे) अवंती भावे यांना १९८३ चे एम्. ए. (मराठी) प्रथम क्रमांकाबद्दल पारितोषिक. १ व ३ आक्टोबर, बालकवी स्मृत्यर्थ श्रीमती शांता शेळके यांची 'गीतकार माडगूळकर' आणि 'आरती प्रभु' या विषयांवर व्याख्याने. १५-१६ आक्टोबर, श्रीगणेश-सरस्वती ठाकूरदेसाई व्याख्यानमालेतील दोन व्याख्याने– वक्ते धोंडो विठ्ठल देशपांडे, विषय 'महाभारतातील दोन नीतिकल्पना' २९-३० आक्टोबर, व. ह. गोळे स्मृत्यर्थ डॉ. अशोक रानडे यांची 'नाटकाचा उदय' व 'संगीत नाटकांचा उदय' या विषयांवर दोन व्याख्याने.

२९ नोव्हेंबर, माधवजूलियन स्मृतीदिनी डॉ. अनुराधा पोतदार यांच्या संचालनत्वाने कविसंमेलन. त्यात आनंद यादव, सरिता पदकी, संजीवनी मराठे, अरुणा ढेरे, गं. ना. जोगळेकर यांचा सहभाग. ६–७ डिसेंबर, ठाकूर-देसाई व्याख्यानमालेत डॉ. व. दि. कुलकर्णी यांची 'रागिणी' आणि 'ब्राह्मणकन्या' या संदर्भात मराठी कादंबरी-संबंधी पुनर्मूल्यात्मक दोन व्याख्याने. २५–२६ डिसेंबर, श्री. म. माटे स्मृत्यर्थ डॉ. आनंद यादव यांची 'मराठी साहित्याच्या मर्यादा' या विषयावर दोन व्याख्याने. १८ जानेवारी, वि. द. घाटे स्मृत्यर्थ प्रा. रमेश तेंडुलकर यांचे 'गोविंदाग्रज आणि रविकिरण मंडळ' या विषयावर व्याख्यान. ६ मार्च, ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ डॉ. ॲन फेल्ड-हाऊस यांचे 'महानुभावांचा वेडापिसा देव' या विषयावर डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान. २० मार्च, बा. सी. मर्ढेकर स्मृत्यर्थ डॉ. रमेश धोंगडे यांचे 'मर्ढेकरांची कविता: एक शैलीवैज्ञानिक दृष्टिकोन' या विषयावर व्याख्यान.

१० एप्रिल, ज्ञानकोशकार केतकर स्मृतिदिनी सकाळी त्यांच्या स्मारकास पुष्पांजली आणि सायंकाळी डॉ. भीमराव कुलकर्णी यांचे 'केतकरांच्या कादंबऱ्यांतील जातिगंड' या विषयावर व्याख्यान. १३ एप्रिलला बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या छायाचित्रास पुष्पहार समर्पण. १९ एप्रिल, नरहर कुरुंदकर स्मृत्यर्थ प्रा. के. ज. पुरोहित

( शांताराम ) यांचे 'लेखकाचे स्वातंत्र्य ' या विषयावर प्रा. प्रभाकर उर्ध्वरेषे यांच्या अध्यक्षतेखाली. २६ मे, गडकरी शताब्दी सोहळ्यात सहभाग. २१ जून, नाथमाधव स्मृत्यर्थ ' सकाळ 'चे संपादक श्री. एस. के. कुलकर्णी यांचे ' स्वातंत्र्योत्तर काळातील ऐतिहासिक कादंबरी 'या विषयावर व्याख्यान.

### शारदीय व्याख्यानमाला :

यंदाची माला ' कादंबरीची जन्मकथा ' या विषयावर आयोजित करण्यात आली होती. दि. १० ते २२ नोव्हेंबर या या अवधीत झालेली व्याख्याने येणेप्रमाणे – गो. नी. दांडेकर ( पडघवली ) भीमराव कुलकर्णी ( ओंकार ), रमेश मंत्री ( महानगर ), ज्योत्स्ना देवधर ( घर गंगेच्या काठी ) वि. ग. कानिटकर ( होरपळ ), ना. सं. इनामदार ( मंत्रावेगळा ), श्री. ज. जोशी ( आनंदीगोपाळ ), आनंद यादव ( गोतावळा ), अरुण साधु ( मुंबई दिनांक ), ह, मो. मराठे ( इतिवृत्त )

### अभिनंदन, सत्कार :

वृत्तान्त अवधीत परिषदेचे भूतपूर्व विश्वस्त तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी आणि भूतपूर्व कार्यवाह प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी ८५ व्या आणि ७६ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला.

नांदेड साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांचा पूर्वपरंपरेनुसार पहिला प्रकट सत्कार ८ मार्चला श्री. शंकरराव खरात यांच्या अध्यक्षतेखाली शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात योजिण्यात आला होता. या प्रसंगी भालचंद्र फडके, आनंद यादव, गं. ना. जोगळेकर आणि सुरेश गरसोळे यांची समयोचित भाषणे झाली. नंतर श्री. पाटील व श्री. खरात यांची भाषणे झाली. सौ. गरसोळे यांनी म्हटलेल्या पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

श्रीमती इंदिरा संत यांच्या ' गर्भरेशीम ' कवितासंग्रहाला साहित्य अकादमीचे पारितोषिक लाभल्याबद्दल त्यांचा प्रथेनुसार प्रकट सत्कार करण्याची योजना होती. तथापि इंदिराबाईंच्या आग्रहामुळे हा सत्कार निमंत्रितांपुरता आणि तोही कवितागायन, गप्पाटप्पा–अशा स्वरूपात करावा लागला. ( ६ एप्रिल ) प्रस्तुत कार्यक्रमाचे प्रसंगी संजीवनी मराठे, पद्मा गोळे, सरोजिनी बाबर, अनुराधा पोतदार, वासंती मुझुमदार, सरिता पदकी, वीणा देव आणि परिषदेच्या कार्यकारिणीचे स्थानिक सभासद उपस्थित होते. कार्याध्यक्ष ग. वा. बेहेरे यांच्या हस्ते शेवटी इंदिराबाईंचा सत्कार करण्यात आला.

### वाङ्मयेतिहास–प्रकाशन :

मराठी वाङ्मयाचा इतिहास – या योजनेतील पहिल्या ( आरंभ ते १३५० ) खंडाचे प्रकाशन २ डिसेंबरला पंढरपूर येथे दर्शनमंडपात ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर यांच्या हस्ते झाले. याप्रसंगी खंडाचे संपादक डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. गुंथर सोन्थायमर, डॉ. ॲन फेल्डहाऊस, डॉ. प्र. न. जोशी, श्री. भा. पं. बहिरट यांची भाषणे झाली. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी परिषदेतर्फे आभार मानिले. प्रस्तुत कार्यक्रम पंढरपूरक्षेत्री आयोजिण्यात श्री. गोपाळ बेणारे यांचे विशेष सहकार्य लाभले. पहिल्या खंडाच्या या प्रकाशनामुळे आरंभ ते १९२० असा सलग आठ–नऊ शतकांचा वाङ्मयेतिहास पाच खंडांत उपलब्ध करून देण्याचे कार्य परिषदेला साधता आले. १९२१ ते ५० हा सहावा खंड आगामी वर्षात पूर्णतेला नेण्याचा संपादक प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. व. दि. कुलकर्णी यांचा संकल्प आहे.

### दिवाळी अंक पारितोषिके :

१९८४ मधील पुढील दिवाळीअंक उत्कृष्ट ठरविण्यात आले व त्यांना ' विविधज्ञानविस्तार ' कर्ते मोरमकर, ' मासिक मनोरंजन ' कर्ते का. र. मित्र आणि ' किर्लोस्कर ' चे शं. वा. किर्लोस्कर यांचे नावे प्रत्येकी रु. १०१ ची पारितोषिके देण्यात आली – **अक्षर** ( संपादक निखिल वागळे ), **अभिजात** ( सं–स्मिता पटवर्धन ), **माणूस** ( सं. श्री. ग. माजगावकर ) याशिवाय ' जाहीरनामा ( सं. विजय तेंडुलकर ) आणि ' गुलमोहर ' ( सं. सुभाष अवचट ) हे दोन अंक उत्कृष्ट म्हणून प्रकट करण्यात आले.



अनुक्रमणिका

कै. अनंत काणेकर यांचे स्मृत्यर्थ दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललितलेखास मिळावयाचे रु. २०० चे पारितोषिक डॉ. **अनुराधा पोतदार** यांना 'अभिजात' मधील '**तो**' या लेखाबद्दल देण्यात आले.

**ग्रंथपारितोषिके :**

१९८४ मधील पुढील काही उत्कृष्ट ग्रंथांना परिषदेतर्फे (काही हितचिंतकांनी देणगीरूपाने ठेविलेल्या रकमां- वरील व्याजातून) पारितोषिके देण्यात आली.

**कादंबरी** – कुणाच्या खांद्यावर, बा. ग. केसकर, रु. १०१ (हरिभाऊ आपटे पारितोषिक) **कविता** उगवाई, वसंत सावंत, रु. २०० (ह. स. गोखले पारितोषिक) **उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती** – 'विष्णुपंत भागवत,' स्मा. समिती, रु. २०० (अ. स. गोखले पारितोषिक) **संपादित ग्रंथ** – शोध सूर्यबिंबाचा, विलास खोले, रु. १०१ (गिरिजा–गंगाधर जांभेकर पारितोषिक.) **समीक्षा**– साहित्याचे तत्त्वज्ञान, वि. ना. ढवळे, रु. ५०० (ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक) **संतवाङ्मय विषयक** – रामदास : प्रतिमा आणि आणि प्रबोध, त्र्यं. वि. सरदेशमुख, ३०० रु. आणि संतसाहित्य चिंतन, यू. म. पठाण, ३०० रु. अशी दोन (तुळशीराम वाघ पारितोषिक) **कुमारवाङ्मय** – बालसिंदबादच्या विज्ञान सफरी, वसंत कर्डिले, रु. २०० (सुशील प्रधान पारितोषिक) **ललितेतर वैचारिक** – खानदेशी, विजया चिटणीस – माडगूळकर, रु. १५० (विश्वनाथ – पार्वती गोखले पारितोषिक), निर्माणपर्व, श्री. ग. माजगावकर, रु. २५० (शि. म. परांजपे पारितोषिक.), मराठी वृत्तपत्रांचा इतिहास, रा. के. लेले, रु. २५० (ना. गो. चापेकर पारितोषिक.)

वरील दोन्ही प्रकारच्या पारितोषिकांची शिफारस करण्यासाठी सौ. शांता किर्लोस्कर, डॉ. म. वि. गोखले, डॉ. द. ता. भोसले आणि प्रा. स शि. भावे (निमंत्रक) या चौघांची समिती नियुक्त करण्यात आली.

**संदर्भ ग्रंथालय :**

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भग्रंथालयाचा ४४० सभासद–वर्गणीदार लाभ घेत असतात. वर्षारंभी ग्रंथसंख्या २२०८९ होती. तीत खरेदी केलेली १२१, पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेली ३७२ आणि देणगीदाखल, तसेच पारितोषिकांसाठी आलेली १९९ अशा एकूण ६९२ ग्रंथांची भर पडून जून ८५ अखेरपावेतो ग्रंथसंख्या २२७८१ झालेली आहे. वर्गणीदारांखेरीज इतर विद्यार्थी अभ्यासकही ग्रंथालयाच्या वेळेत ग्रंथालयात बसून ग्रंथालयाचा लाभ घेत असतात.

**संशोधन (प्रकाशन) :**

'भाषा व साहित्य : संशोधन' (संपादक डॉ. वसंत स. जोशी) या प्रकल्पातील पहिला खंड (३० लेख, पृष्ठे सुमारे ६००) सुमारे चार वर्षांपूर्वी प्रकाशित करण्यात आला. त्यानंतर सांप्रतच्या कार्यकारी मंडळाने दुसऱ्या खंडाचे काम डॉ. जोशी आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्यावर सोपविले होते. अद्ययावत प्रबंधसूचीसह या खंडात पहिल्या खंडात न आलेल्या सोळा संशोधनपर लेखांचा समावेश आहे. प्रस्तुत खंड कार्यकारी मंडळाच्या कालावधीत, म्हणजे ३० जून १९८५ रोजी प्रकाशित करता आला ही विशेष आनंदाची गोष्ट होय. प्रकाशन समारंभाचे अध्यक्ष श्री. शंकरराव खरात होते आणि प्रकाशन नांदेड संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते झाले. या प्रसंगी कार्याध्यक्ष ग. वा. बेहेरे, डॉ. शं. गो. तुळपुळे, प्रा. अंजली सोमण आणि संपादकद्वय यांची समयोचित भाषणे झाली.

**मराठी वाङ्मयकोश**

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित होणाऱ्या 'मराठी वाङ्मय कोश' प्रकल्पामधील खंड २ (१८५७ ते १९४७) चे कार्य परिषदेने गतवर्षी स्वीकारले होते व त्याप्रमाणे चालू वर्षात विभागीय मुख्य संपादक संपादक प्रा. स. शि. भावे यांनी डॉ. ह. सि. निर्मळे यांच्या सहकाऱ्याने ग्रंथपरिचयात्मक नोंदणीचे कार्य रीतसर सुरू केले. जून ८५ पर्यंत सुमारे ८० ग्रंथपरिचयपर नोंदी हाती आल्या.



अनुक्रमणिका

**श्रद्धांजली :**

१६ जुलै – कविवर्य बा. भ. बोरकर यांना प्रकटरीत्या श्रद्धांजली. श्री. शंकरराव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत सर्वश्री व. दि. कुलकर्णी, वि. म. कुलकर्णी, स. शि. भावे, पुरुषोत्तम पाटील यांची भाषणे झाली. श्री. पु. ल. देशपांडे यांनी बोरकर यांच्या दोन कवितांचे वाचन केले व शेवटी 'गडद निळे' या कवितेची टेप ऐकवण्यात आली.

२७ जुलै – विख्यात ग्रामीण लेखक कवी आणि परिषदेचे माजी कार्यवाह, उपाध्यक्ष कै. ग. ल. ठोकळ यांना प्रकट सभेत श्रद्धांजली वाहण्यात आली. श्री. खरात यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत सर्वश्री ग. वा. बेहेरे, आनंद यादव, वसंतराव नेर्लेकर, यशवंत पेठकर आणि सरोजिनी बाबर यांची भाषणे झाली.

९ नोव्हेंबरला भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. या सभेत अध्यक्ष शंकरराव खरात आणि सर्वश्री ग. वा. बेहेरे, ना. ग. गोरे, भीमराव कुलकर्णी, स. शि. भावे यांची भाषणे झाली.

३ डिसेंबरला कै. यशवंतराव चव्हाण यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. सर्वश्री शंकरराव खरात, ग. वा. बेहेरे, सरोजिनी बाबर, मा. प. मंगूडकर, अनंतराव पाटील यांनी आपल्या भाषणातून मराठी साहित्य, संस्कृती, कला इत्यादी क्षेत्रांत कै. यशवंतराव यांनी केलेल्या सेवेचा विशेष उल्लेख केला.

परिषदेचे माजी कर्तबगार कार्यवाह प्रा. दे. द. वाडेकर, विचारवंत साहित्यिक डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे आणि प्रसिद्ध कादंबरीकार श्री. वसंत वरखेडकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी २३ मार्चला सभा भरली होती. डॉ. प्र. न. जोशी, डॉ. ग. ना. जोशी आणि अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी समुचित भाषणे करून वरील तिघांना श्रद्धांजली वाहिली.

परिषदेचे एक माजी कार्यवाह आणि प्रसिद्ध प्रकाशक कै. रा. ज. देशमुख आणि इतिहाससंशोधक कै. ग. ह. खरे यांच्या निधनानंतर त्यांना पुष्पहार घालून परिषदेने श्रद्धांजली वाहिली.

**कार्यालयीन सभा :**

वर्षभरात कार्यकारी मंडळाच्या ४, विशेष साधारण सभा २ आणि ३०-९-८४ रोजी वार्षिक साधारण सभा अशा एकूण ७ सभा झाल्या. श्री. शंकरराव खरात यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या साधारण सभेत १९८३-८४ चे कार्यवृत्त, हिशेबपत्रके, ८४-८५ चा अर्थसंकल्प यांना संमती देण्यात आली. तसेच इमारत विस्तारासंबंधी आर्किटेक्ट श्री. व्ही. व्ही. वडवे यांनी माहिती निवेदन केल्यावर संकल्पित विस्तार योजनेचा सर्वांगीण विचार करून तो कार्यकारी मंडळापुढे ठेवण्यासाठी तिघे विश्वस्त, कार्याध्यक्ष आणि कोषाध्यक्ष यांची एक समिती नियुक्त करण्यात आली. घटना दुरुस्तीसाठी १४ आक्टोबर व ३१ मार्च रोजी विशेष सभा श्री. वि. त्र्यं. शेटे आणि प्रा. गं. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली भरल्या होत्या. त्यात परिषदेचे कार्यक्षेत्र, कार्यकारी मंडळाची रचना आणि वर्गणीवाढ या दुरुस्त्यांना मान्यता देण्यात आली.

**देणग्या :**

या वर्षात संस्थेला श्री. अनंतराव कुलकर्णी (कॉंटिनेंटल प्रकाशन) श्री. मा. गो. डोमाळे (संत शिरोमणी श्रीसावता महाराज व्याख्यानमालेसाठी) आणि श्री. कृष्णकुमार गजानन ठोकळ यांनी अनुक्रमे रु. ५० हजार, रु.५ हजार आणि रु. ५ हजार– अशा देणग्या दिलेल्या आहेत व त्यांचा विनियोग दात्यांच्या इच्छेनुरूप व्हावयाचा आहे. श्री. अनंतराव यांच्या देणगीवरील व्याजातून कै. चिं. वि. जोशी आणि कविवर्य कुसुमाग्रज यांच्या नावे दरवर्षी अनुक्रमे एका उत्कृष्ट विनोदी पुस्तकाला आणि कवितासंग्रहाला, तसेच त्यांच्या प्रकाशकांना पारितोषिके दिली जाणार आहेत. श्री. डोमाळे यांच्यातर्फेची देणगी, श्रीसंत सावतामाळी यांच्या स्मृत्यर्थ दोन संतवाङ्मयविषयक व्याख्याने योजण्यासाठी आहे. परिषदेचे माजी कार्यवाह आणि ग्रामीण कथा–कवि–कादंबरीकार कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मृत्यर्थ पुणे आणि अहमदनगर येथे दोन कार्यक्रम करण्यासाठी श्री. कृष्णकुमार ठोकळ यांची देणगी आहे. वरील तिघा देणगीदारांची परिषद ऋणी आहे.

**साहित्य-पत्रिका :**

परिषदेच्या वाङ्मयीन त्रैमासिकाचे (संपादक भीमराव कुलकर्णी) चालू वर्षात 'वाङ्मयीन वाद व वादळे' (दिवाळी ८४), त्यानंतरचा ऑक्टोबर ते डिसेंबरचा क्र. २३१, आणि २६ मे ८५ रोजी प्रकाशित झालेला गडकरी संस्मरण– असे तीन अंक प्रसिद्ध झाले. दोन्ही विशेषांकांचे सभासदांकडून चांगले स्वागत झाले.

**परीक्षाकार्य :**

१. डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या संचालनाखाली यंदा तीन प्रकारचे परीक्षाकार्य समाधानकारक झाले. डॉ. कल्याण काळे, डॉ. अंजली सोमण, डॉ. अपर्णा झा, प्रा. श्री. बा. गोखले, डॉ. म. वि. गोखले, डॉ. सुधाकर भोसले, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. प्र. ना. परांजपे, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. सुप्रिया अत्रे, प्रा. आरती दातार, डॉ. अंजली कान्हेरे, प्रा. आशा जोशी, प्रा. सुषमा जोगळेकर, प्रा. नीलिमा बाकरे यांचे मराठी परीक्षा कार्यात सहकार्य लाभले. तसेच विविध केंद्रसंचालकांनीही आत्मीयतेने सहकार्य केले.

परीक्षाकेंद्रे ७ होती. प्रवेश, प्राज्ञ आणि विशारद या परीक्षांना २२८, ३६ आणि १० उमेदवार होते. तिन्ही परीक्षांतील पहिले तीन उत्तीर्ण येणेप्रमाणे– **प्रवेश**– अश्विनी शांताराम वाकचौरे (ठाणे) माधवी द. ओक आणि नंदिनी रा. कर्डिले (नाशिक) अपर्णा महाजन (ठाणे) **प्राज्ञ**– माधवी कवडीकर (पुणे), स्मिता जोशी (पुणे) नीता इदाते (इस्लामपूर) **विशारद**– वंदना बोकील, द. शं. चवरे, सुवर्णलता काकडे (सर्व पुणे)

२. पुण्यासारख्या वाढत्या औद्योगिक शहरातील अमराठी भाषिकांची मराठी–शिक्षणाची गरज लक्षात घेऊन परिषदेने १९८२ पासून मराठी प्रमाणपत्र परीक्षेचे वर्ग सुरू केले आहेत. पाच महिने चालविलेल्या या वर्गाचा या वर्षी २३ अमराठी भाषिकांनी लाभ घेतला. १ मार्च व ८ मार्च रोजी लेखी व तोंडी परीक्षा घेण्यात आली व एप्रिलमध्ये निकाल जाहीर करण्यात आला. परीक्षेस बसले १२, उत्तीर्ण १२. उत्तीर्णांचे प्रमाण शे. १००%. या परीक्षेत श्री. आर. बी. अय्यर यांना १५० पैकी १३३ गुण मिळून ते पहिले आले.

अमराठी भाषिकांसाठी चालविलेल्या या वर्गासाठी डॉ. कल्याण काळे, डॉ. अंजली सोमण, डॉ. अपर्णा झा व प्रा. श्री. बा. गोखले यांनी अध्यापनाचे काम केले.

३. मॉरिशसमधील मॉरिशस मराठी मंडळी फेडरेशन या संस्थेने विनंती केल्यावरून तेथील मराठी भाषिकांसाठी मराठी 'प्राज्ञ' परीक्षा घेण्याचे काम परीक्षा विभागाने केले. महाराष्ट्राचा इतिहास, संस्कृती, वाङ्मय, भाषा इत्यादींचा या परीक्षेच्या अभ्यासक्रमात समावेश करण्यात आला होता. अन्य देशांतील मराठी भाषिकांसाठी अशा प्रकारचे उपयुक्त काम यशस्वीपणे पार पडले. २६ डिसेंबर ८४ रोजी ही परीक्षा तेथे घेण्यात आली. एकूण २२ उमेदवार या परीक्षेस बसले व त्यातील १९ उत्तीर्ण झाले. कु. गौरिया होमराजेन ही विद्यार्थिनी ४०० पैकी २४१ गुण मिळवून पहिली आली. या परीक्षेच्या कामात डॉ. गं. ना. जोगळेकर यांना प्रा. सौ. आरती दातार, प्रा. सौ. नीलिमा बाकरे व प्रा. आशा जोशी यांनी सहकार्य केले. उत्तीर्ण उमेदवारांना देण्यासाठी जुलै ८५ मध्ये येथून प्रशस्तिपत्रे पाठविण्यात आली.

**शाखासभा आणि संलग्नसंस्था :**

परिषदेच्या कार्यक्षेत्रात तिच्या २५ शाखा आणि २० संलग्नसंस्था आहेत व त्यांचे कार्य एकूण समाधानकारक आहे. 'पत्रिके'च्या मे अखेरच्या गडकरी विशेषांकात वालचंदनगर, खोपोली, नाशिक, धुळे, जळगाव, अहमदनगर, इचलकरंजी, बडोदा, मंगळवेढा आणि सोलापूर या शाखांकडून आलेले वृत्त देण्यात आले होते. त्यानंतर ज्या शाखांकडून नवीन वृत्त आले ते येणेप्रमाणे– **वाई :** 'संदेश'कार कोल्हटकर स्मृत्यर्थ माधव गडकरी यांचे व्याख्यान, 'कृष्णाकाठ' या आत्मकथेसंबंधी श्री. अशोक भट यांचे परिचयपर भाषण, 'शल्यकौशल्य' (डॉ. पुरंदरे) पुस्तकासंबंधी डॉ. शरद अभ्यंकर यांचे भाषण, रवींद्र भटकृत 'आभाळाचे गाणे' कादंबरीचे वाचन, श्री. सुरेश अष्टपुत्रे आणि सौ. नीलम हातेकर यांना पी. एच. डी. लाभल्याबद्दल त्यांचा सत्कार. लोकमान्य वाचनालय आणि

वसंत व्याख्यानमाला या दोन संस्थांचे सहकार्य शाखेला नेहमीच लाभत असते. **सोलापूर** : कविवर्य बोरकर, द. मो. दामले आणि अनिल बर्वे यांना श्रद्धांजली, गो. नी. दांडेकर, वी. एस. कुलकर्णी, कवी शंकर वैद्य आणि प्रभाकर पणशीकर यांचा सत्कार, 'धांडोळा' (प्रा. पसारकर) ग्रंथाचे प्रकाशन आणि कै. अण्णाभाऊ साठे यांचेसंबंधी प्रा. अजिज नदाफ यांचे व्याख्यान. **येवला** : रामदास फुटाणे यांच्या कवितांच्या कॅसेटस श्रवणाचा कार्यक्रम, रमेश जोशी (कल्याण) यांचे 'गीतरामायणा'चे गायन. **जळगाव** : श. रा. राणे यांना पी. एच. डी. लाभल्याबद्दल त्यांचा सत्कार, कै. बोरकर यांच्या श्रद्धांजली सभेत डॉ. चौधरी, उत्तम कोळगावकर, नसीम शेख इत्यादींचा सहभाग. कै. ग. ल. ठोकळ यांच्य स्मृत्यर्थ भादली गावी प्राचार्य राम शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली विशेष कार्यक्रम, त्यात नारायण शिरसाळे. वि. घ. ठाकरे, सुभानराव पाटील, श्रीनिवास पाटील, पुरुषोत्तम नारखेडे इत्यादींचा समयोचित सहभाग, 'आठवणींचे पक्षी' (सोनकांवळे) या पुस्तकावर चर्चा व सुरेखा छापेकर यांचे भाषण, रा. रं. बोराडे यांचे एक विशेष भाषण, खानदेशी साहित्यिक प्रा. रू. गो. चौधरी यांना श्रद्धांजली. **नंदुरबार** : कै. गडकरी जन्मशताब्दीनिमित्त सर्वश्री प्रा. कारले, मार्तंडराव जोशी, अरुण वडाळकर, रविकिरण झोळ, शं. बा. शिंपी, बा. न. सरदेसाई, ल. के. कुलकर्णी, प्रा. बोरसे यांची विविध वाङ्मयीन पैलूंवर भाषणे. **साक्री** : कै. गडकरी स्मृत्यर्थ त्यांच्या नाटकांमधील प्रवेशाचे वाचन सहभाग– सौ. कुलकर्णी प्रा. रत्नाकर कुलकर्णी. तसेच प्रा. तानसेन जगताप यांचे 'एकच प्याला' संबंधी व्याख्यान. **ठाणे** : डॉ. रा. शं. वाळिंबेयांचे शाखेच्या वर्धापनदिनी गडकऱ्यांसंबंधी व्याख्यान, पी. सावळाराम यांच्या अध्यक्षतेखाली स्थानिक कविसंमेलन. सौ. आशा साठे कृत 'फुले वेचिली पण' हा गडकऱ्यांसंबंधी कार्यक्रम, साहित्यिक गप्पा गोष्टी, ठाणे जिल्हा साहित्यिक मेळावा, त्यात प्रा. माधव मनोहर यांच्या संचालनाने विनोद आणि आत्मचरित्रे या विषयावर परिसंवाद आणि प्रा. शंकर वैद्य यांचे अध्यक्षतेखाली कविसंमेलन, श्री. गणेश–सरस्वती ठाकूरदेसाई व्याख्यानमालेतील पाचवे व्याख्यान डॉ. अशोक रानडे (विषय–साहित्य, कान आणि वाणी)

**त्रैवार्षिक निवडणुका :**

जून १९८५ मध्ये परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका घटनानियमानुसार नेमलेल्या निर्वाचनमंडळातर्फे सुरळीतपणे पार पडल्या आणि १६ जूनला नवे कार्यकारी मंडळ प्रकट करण्यात आले. निर्वाचन मंडळाचे सदस्य श्री. मो. रा. वाळंबे, श्री. य. गो. तथा दादा जोशी आणि श्री. गो. कृ. पटवर्धन यांची परिषद ऋणी आहे.

**निरोप व ऋणनिर्देश :**

गेल्या तीन वर्षांत परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध, विधायक कार्यात अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सहकार्य लाभले. महाराष्ट्र राज्याचे शिक्षणखाते, ग्रंथालय संचालनालय, साहित्यसंस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे महानगरपालिका, विशिष्ट कार्यासाठी देणग्या देणारे देणगीदार, शाखासभांचे पदाधिकारी, वृत्तपत्रे, नियतकालिके, नव्याने झालेले शेकडो आजीव सभासद – इत्यादी सर्वांचे आम्ही ऋणी आहोत. नव्या कार्यकारी मंडळाला सर्वांनी असेच सहकार्य देत राहावे व संस्थेचे कार्य नि प्रतिष्ठा वाढवावी अशी सर्वांना कळकळीची विनंती आहे.

आपले,

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**

कार्यवाह

---

## नवीन आजीव सभासद

श्री. अरविंद नी. नवरे (पुणे), श्रीमती विमल गो. गद्रे (पुणे), श्री. निरंजन गो. आगाशे (पुणे), मोहन मा. हरकरे (पुणे), डॉ. अनुराधा पोतदार (पुणे), मनोहर ज. अभ्यंकर (पुणे), श्री. जगन्नाथ महेश्वर व श्री. हरिभाऊ शितोळे (सोलापूर)

---

महाराष्ट्र साहित्य परिषद
शेडयूल ११
दिनांक १-७-८४ ते ३०-६-८५

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **मालमत्तेसंबंधी** | | २८२०=८० |
| भुईभाडे-म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर | ५०३-०० | |
| विमा (ग्रंथालय) | ६५-०० | |
| जनरल मेटेनन्स | २२५२-८० | |
| **व्यवस्थापन** | | ३९२०२=६९ |
| पगार व प्राव्हिडंडफंड | १८८६८-३५ | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | ५५०५-०० | |
| टपाल व दूरध्वनी | ३७५७-२५ | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादीखर्च) | ५५६४-६० | |
| प्रवास व प्रचारकार्य | ४८९-८० | |
| वीज | ५०१७-६९ | |
| **हिशोव तपासनीस** | | ७००=०० |
| **किरकोळ खर्च** | | ४०८०=०० |
| आतिथ्य | २६९३-०० | |
| विश्वस्त | ७६४-०० | |
| इतर | ५१३-०० | |
| इतर सामान | ११०-०० | |
| **त्रैवार्षिक निवडणूक खर्च** | | १०९१२-०० |
| **घसारा** | | ६१८७-८१ |
| इमारत | १५६२-४५ | |
| फर्निचर व डेडस्टॉक | १०००-५६ | |
| ग्रंथालय | ३६२४-८० | |
| **संस्थेच्या उद्दिष्टांकरिता** | | ९४३१५-०१ |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ७४०७-०१ | |
| महामंडळ (प्रवास व वर्गणी) | ३२५५-०० | |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) | ८२१९-७५ | |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इत्यादी.) | ५५९८२-१५ | |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | ६५२१-०५ | |
| परीक्षा | १०१५६-१५ | |
| वाङ्मयकोश | २७७३-९० | |

नियम ( १ ) प्रमाणे
या वर्षाचे उत्पन्न व खर्च पत्रक

| उत्पन्न | रुपये पैले | रुपये पैसे |
|---|---|---|
| **व्याज :** | | |
| सेव्हिंग खात्यावरील | १९३९–५० | ३५२९२–३० |
| ठेवींवरील | ३३२६५–६५ | |
| डिव्हीडंड | ८७–१५ | |
| **देणग्या :** | | २९१४०–०० |
| **अनुदाने :** | | ३२०००–०० |
| वाङ्मयेतिहास | १४०००–०० | |
| वाङ्मयकोश | ५०००–०० | |
| ग्रंथालय | २५००–०० | |
| महानगरपालिका | १५००–०० | |
| पत्रिका | ९०००–०० | |
| **इतर उत्पन्ने :** | | २९१५४–३५ |
| परीक्षाशुल्क | ९३३९–१० | |
| इतर जमा | १६२९–०० | |
| साधारण सभासद वर्गणी | १२७५६–०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | ५३२०–२५ | |
| संलग्न संस्था वर्गणी | ११०–०० | |
| तूट | | ४३०९३–८३ |
| | | १६८६७०-०० |

पुढे चालू

| खर्च | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
| --- | --- | --- | --- | --- |
| हिरक महोत्सवी प्रकाशने | | | ८००–०० | |
| इतर प्रकाशने | | | २६६–५७ | |
| पारितोषिके व स्मृतिदिन खर्च | | | ९३८५–६० | |
| | | | १६८६७०–४८ | |

तपासले. बरोबर आहे. आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार

पुणे
५।९।१९८५

एन्. सी. भळगट
पाटणकर अँड असोसिएटस्. चार्टर्ड अकौंटंटस्करिता.

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
**शेड्यूल ८**
**दिनांक ३० जून**

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **विश्वस्तनिधी** | | ३१४८००–४५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २७४३९०–४५ | |
| + आजीव सभासद ( ८४–८५ ) | ४०४१०–०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| ( अ ) इमारत | | ८९६४४–९४ |
| ( ब ) ग्रंथालय | | २३५७३–१० |
| ( क ) वाङ्मय इतिहास योजना | | ४६४३३–५१ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ५३२८०–२९ | |
| + ८४–८५ मधील विक्री | ३८७९०–३० | |
| + ३–०६–८५ चा शिल्लक साठा | ४६०००–०० | |
| | १३८०७०–५९ | |
| – १–७–८४ चा शिल्लक साठा | ३३६३३–२० | |
| – ८४–८५ पर्यंतचा खर्च | ५८००३–८८ | |
| | ४६४३३–५१ | |
| ( ड ) पारितोषिके व स्मृतिदिन निधी | | १,४४६९६–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ८२८१८–०० | |
| + ८४–८५ मधील जमा | ६१८७८–०० | |
| **प्रॉव्हिडंड फंडखाते** | | १३६२८–१२ |
| मागील ताळेबंदवरून | ११८५५–१२ | |
| + ८४–८५ मधील जमा | १७७३–०० | |
| **इतर देणी** | | ३२०९१–९१ |
| **अनामत** | | १००००–०० |
| **ग्रंथालयं अनामत** | | १८३९६–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १५८०१–०० | |
| + ८४–८५ मधील जमा | २५९५–०० | |
| हिशेब तपासनीस | | ५००–०० |



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



नियय १ प्रमाणे
१९८५ रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | ६०९३५ ४५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ६२४९७-९० | |
| – घसारा २·५ टक्के | १५६२–४५ | |
| **गुंतवणुका** | | ११५५०–०० |
| (अ) रोखे दर्शनी किंमतीचे ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४७ | ५३००–०० | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन | २७००–०० | |
| | ८०००–०० | |
| (ब) शेअर्स – सेंट्रल प्रॉव्हीन्सेस रेल्वेज | २३००–०० | |
| महा. स्टेट को-ऑफ बँक | १२५०–०० | |
| | ३५५०–०० | |
| | ११५५०–०० | |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | ९००५- १३ |
| मागील ताळेबंदावरून | १०००५–६९ | |
| – घसारा १० टक्के | १०००–५६ | |
| | ९००५–१३ | |
| **ग्रंथालय** | | ३२६२३-२५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३३०९९–९० | |
| + ८४-८५ मधील खरेदी | ३१४८–१५ | |
| | ३६२४८–०५ | |
| – घसारा १० टक्के | ३६२४–८० | |
| | ३२६२३–२५ | |
| **शिल्लक साठा** | | ४९०१६–१० |
| वाङ्मय इतिहास प्रकाशने | ४६०००–०० | |
| संशोधन प्रकाशने | ३०१६–१० | |
| **वीजबोर्ड अनामत** | | २६०–०० |
| **आयकर वसुली** | | ७५–०० |
| **इतर येणी** | | ४१६८–०० |
| मे. पाम एंटरप्राइझेस | १६८–०० | |
| मे. सुलभ मुद्रणालय | ४०००–०० | |

| जिंदगी व येणी | | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|
| **ॲडव्हान्स** | | | १२२२-८४ |
| **संशोधन प्रकाशने** | | | ९९०६-७७ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | ३६२-५५ | |
| + ८४-८५ मधील विक्री | | २४६५-२५ | |
| + ३०-६-८५ चा साठा | | ३०१६-१० | |
| | | ५८४३-९० | |
| – १-७-८४ चा साठा | | ५४८१-३५ | |
| – ८४-८५ मधील खर्च | | १०१६९-३२ | |
| **ठेवी** | | | ३८५९००-०० |
| **पारितोषिके व व्याख्याने** | | | |
| वि. द. घाटे स्मरणार्थ | | ३५००-०० | |
| सुशील प्रधान स्मरणार्थ | | ३०००-०० | |
| गणेश सरस्वती ठाकूर देसाई | | १२०००-०० | |
| केतकर स्मृति दिन | | १५००-०० | |
| शि. म. परांजपे पारितोषिक | | ३५००-०० | |
| गोखले बंधू पारितोषिके | | २०००-०० | |
| | | २५५००-०० | |
| **( ब ) बँक ऑफ महाराष्ट्र ठेवी :** | | २३४००-०० | |
| **( क ) विश्वस्त ठेवी :** | | २३४५००-०० | |
| बँक ऑफ बडोदा | ९९५००-०० | | |
| राष्ट्रीय केमिकल फर्टीलायझर कॉर्पो. | २५०००-०० | | |
| काम्प्युटर कार्पोरेशन | २५०००-०० | | |
| टाटा लोकोमोटीव्ह इंजिन्स | १००००-०० | | |
| टाटा आयर्न अँड स्टील कं. | १५०००-०० | | |
| लार्सन अँड टुब्रो कं. | ६००००-०० | | |
| **( ड ) कार्यकारी मंडळ ठेवी** | | ३१५००-०० | |
| पुणे पीपल्स को. बँक | २१५००-०० | | |
| स्टील ॲथॉरिटी ऑफ इंडिया | ५०००-०० | | |
| इंडियन टेलिफोन इंडस्ट्रीज | ५०००-०० | | |

| निधी व देणी | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | ६९३७६४–४३ | |
| | | | ६९३७६४–४३ | |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार. पाटणकर अँड असोसिएटस चार्टर्ड अकौंटसकरिता

पुणे, दि. ५।९।१९८५ **( एन्. सी. भळगट )** भागीदार

| जिंदगी व येणी | | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|---|
| (इ) स्टेट बँक ऑफ इंडिया (विश्वस्त) | ७००००–०० | | | | |
| (फ) ग्रंथालय अनामत | १०००–०० | | | | |
| | ३८५९००–०० | | | | |
| प्रॉव्हिडंड फंड ठेवी | | | | १३६२८–१२ | |
| ठेवी | ८२९४–०१ | | | | |
| सेव्हींग खाते | ५३३४–११ | | | | |
| तूट : | | | | ५९७०८–२६ | |
| मागील ताळेबंदावरून | १६६१४–४३ | | | | |
| + ८४–८५ मधील तूट | ४३०९३–८३ | | | | |
| अखेरच्या शिलका : | | | | ५५८६५–५१ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (से.) | १८००६–३४ | | | | |
| स्टेट बँक विश्वस्त खाते (से.) | ७८२०–४४ | | | | |
| बँक ऑफ वडोदा विश्वस्त (से.) | २७३७०–४७ | | | | |
| बँक ऑफ वडोदा (करंट) | २४४०-७६ | | | | |
| रोख | २२७–५० | | | | |
| | | | | ६९३७६४–४३ | |

| म. श्री. दीक्षित | राजा फडणीस | सर्जेराव घोरपडे | मधुकर परांजपे | वि. ग. माटे |
|---|---|---|---|---|
| कोषाध्यक्ष | कार्यवाह | विश्वस्त | विश्वस्त | विश्वस्त |



अनुक्रमणिका

## अर्थसंकल्प : १९८५–८६

| खाते | संकल्प १९८४–८५ | प्रत्यक्ष १९८४–८५ | संकल्प १९८५–८६ |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंट | ३५०००–०० | ३५२८२–३० | ५०,०००–०० |
| देणग्या | ३५०००–०० | २९१४०–०० | ४०,०००–०० |
| शासकीय अनुदान (मेन्टेनन्स) | १५०००–०० | — | १५,०००–०० |
| महानगरपालिका अनुदान | १५००–०० | १५००–०० | १५००–०० |
| सा. सं. मंडळ अनुदान (पत्रिका) | ९०००–०० | ९०००–०० | ९०००–०० |
| ग्रंथालय अनुदान | २५००–०० | २५००–०० | २५००–०० |
| पत्रिका वर्गणी, जाहिरात | १००००–०० | ५३२०–२५ | १०,०००–०० |
| साधारण सभासद वर्गणी | २००००–०० | १२७५६–०० | १५,०००–०० |
| परीक्षा | ८०००–०० | ९३३९–१० | १०,०००–०० |
| संलग्न संस्था वर्गणी | २२५–०० | ११०–०० | २००–०० |
| किरकोळ | १०००–०० | १६२९–०० | १०००–०० |
| प्रकाशने | १५००–०० | १३९८–२५ | १५००–०० |
| अनामत | — | १०,०००–०० | १२,०००–०० |
| विभागीय संमेलन | १०,०००–०० | — | १०,०००–०० |
| तूट | — | — | ३३,३००–०० |
| | | | २,११,००० |

**राजेन्द्र बनहट्टी**
(कार्याध्यक्ष)

**म. श्री. दीक्षित**
(कोषाध्यक्ष)

( १ जुलै १९८५ ते ३० जून १९८६ अखेर )

| | संकल्प १९८४–८५ | प्रत्यक्ष १९८४–८५ | संकल्प १९८५–८६ |
|---|---|---|---|
| कर व भुईभाडे | १००० ०० | ५०३–०० | १०००–०० |
| इमारत देखभाल व विमा | २०००–०० | २३१७-८० | ३०००–०० |
| फर्निचर व नवीन सामान | २०००–०० | ११०–०० | २०००–०० |
| पगार व प्रा. फंड | २०,०००–०० | १८,८६८–३५ | २०,०००–०० |
| छपाई, टाईपिंग, स्टेशनरी | ६०००–०० | ५५०५–०० | ६०००–०० |
| टपाल व दूरध्वनी | ४०००–०० | ३७५७–२५ | ५०००–०० |
| वीज | ८०००-०० | ५०१७–६९ | ६०००–०० |
| कार्यकारी मंडळ सभा | ४०००–०० | ५५६४–६० | ५०००-०० |
| प्रवास व प्रचार कार्य | ५००० ०० | ४८९–८० | ५०००-०० |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | १३,०००–०० | ७४०७ -०१ | १५,०००–०० |
| पत्रिका ( छपाई, कागद, टपाल इ. ) | ५५,०००–०० | ५५,९८२–१५ | ६५,०००-०० |
| ग्रंथालय वेतन, खरेदी इ. | १५,०००-०० | ९६६९-२० | १२,०००–०० |
| परीक्षा | ८००० ०० | १०,१५६–१५ | १०,०००–०० |
| शाखा सभा वर्गणी हिस्सा | १०,०००–०० | ८२१९-७५ | १०,०००–०० |
| महामंडळ सभा व वर्गणी | ५०००–०० | ३२५५-०० | ५०००-०० |
| अतिथ्य | ५०००–०० | २६९३–०० | ५०००-०० |
| ग्रंथपारितोषिके व स्मृतिदिन | ७००० ०० | ७८३०–६० | १२,०००–०० |
| हिशेबतपासनीस | ५०० ०० | ७००–०० | १०००-०० |
| किरकोळ | १००० ०० | ५१३ ०० | १०००–०० |
| प्रकाशने ( इतर ) | १०००–०० | ८८१ २५ | १०००–०० |
| विभागीय संमेलन | १०,०००–०० | — | १०,०००-०० |
| घसारा | १०,०००–०० | ६१८७–८१ | १०,०००–०० |
| त्रैवार्षिक निवडणूक | १५००० –०० | १०,९१२–०० | – |
| विश्वस्त व्यवहार | ५००–०० | ७६४–०० | १०००–०० |
| | | | २,११,०००–०० |

| राजा फडणीस ( कार्यवाह ) | म. वि. गोखले ( कार्यवाह ) | प्रभाकर अत्रे ( कार्यवाह ) |
|---|---|---|



अनुक्रमणिका








# नांदेड संमेलन

(प्रतिनिधींना सूचना)

नांदेड येथे २५, २६ आणि २७ ऑक्टोबर १९८५ रोजी अ. भा. साहित्य संमेलनाचे ५९ वे अधिवेशन श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली भरत आहे.

(१) या संमेलनासाठी म. सा. परिषदेच्या ज्या सभासदांना प्रतिनिधी म्हणून जावयाचे असेल त्यांनी प्रतिनिधीशुल्क म्हणून एकूण ७५ रु. 'कार्यवाह, म. सा. संमेलन, ५३ भाग्यनगर, नांदेड' किंवा 'कार्यवाह, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०' या पत्त्यावर पाठवावेत. प्रतिनिधी होणाऱ्या सभासदांना रेल्वे आणि एस. टी. भाड्याची सवलत मिळणार आहे.

(२) संमेलनात मांडण्यासाठी ज्या सभासदांना ठराव पाठवायचे असतील त्यांनी ठरावाच्या दोन प्रती सूचक–अनुमोदकांच्या स्वाक्षरीसह 'कार्यवाह, म. सा. परिषद, टिळकरस्ता, पुणे ३०' या पत्त्यावर २५ सप्टेंबर १९८५ पर्यंत पाठवाव्यात.

(३) प्रतिनिधी वा ठरावांचे सूचक-अनुमोदक महाराष्ट्र साहित्य परिषदेचे संमेलनापूर्वी किमान सहा महिने सभासद असणे आवश्यक आहे याची कृपया नोंद घ्यावी.

कार्यवाह
म. सा. परिषद, पुणे



## महाराष्ट्र साहित्य परिषद : विविध समित्या
## ( १९८५ ते १९८८ )

कार्यकारी मंडळाच्या दि. ७-७-१९८५ च्या सभेत खालीलप्रमाणे समित्या स्थापन करण्यात आल्या.

( १ ) **सभासद वाढ व मंजुरी** : राजा फडणीस ( निमंत्रक ) राजेन्द्र बनहट्टी, म. वि. गोखले, म. श्री. दीक्षित.

( २ ) **पदाधिकारी समिती** : राजेन्द्र बनहट्टी ( निमंत्रक ), म. श्री. दीक्षित, वसंत स. जोशी, राजा फडणीस, डॉ. म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे.

( ३ ) **पत्रिका-संपादन** : वसंत स. जोशी ( संपादक ) राजा फडणीस, ज्योत्स्ना देवधर, म. ना. अदवंत.

( ४ ) **संशोधन समिती** : म. ना. अदवंत ( निमंत्रक ), गं. ना. जोगळेकर, वसंत स. जोशी, गो. म. कुलकर्णी, लीला गोविलकर.

( ५ ) **साहित्य परिषद पारितोषिक समिती** : राजेन्द्र बनहट्टी, ( निमंत्रक ) राजा फडणीस, म. वि. गोखले, गो. म. कुलकर्णी, ज्योत्स्ना देवधर, म. ना. अदवंत.

( ६ ) **विभागीय संमेलन समिती** : राजा फडणीस ( निमंत्रक ), म. द. हातकणंगलेकर, रा. व्यं. छत्रपती, प्रभाकर अत्रे, भैरव कुंभार, रमेश वरखेडे, लीला गोविलकर.

( ७ ) **वाङ्मयेतिहास समिती** : राजेन्द्र बनहट्टी ( निमंत्रक ), गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी, वसंत सावंत, मंदाकिनी खांडेकर.

( ८ ) **कार्यक्रम समिती** : म. वि. गोखले ( निमंत्रक ), ज्योत्स्ना देवधर, गं. ना. जोगळेकर, लीला गोविलकर, गो. म. कुलकर्णी, मंदाकिनी खांडेकर.

( ९ ) **ग्रंथालय समिती** : म. श्री. दीक्षित ( निमंत्रक ), राजा फडणीस, म. ना. अदवंत, राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी, ज्योत्स्ना देवधर.

(१०) **ग्रंथ पारितोषिक समिती** : म. वि. गोखले ( निमंत्रक ), देवकीनंदन सारस्वत, वसंत सावंत, ज्योत्स्ना देवधर, लीला गोविलकर.

(११) **परीक्षा समिती** : गं. ना. जोगळेकर ( निमंत्रक ), प्रभाकर अत्रे, द. ता. भोसले, कल्याण काळे, आरती दातार.

(१२) **शाखा समिती** : राजा फडणीस ( निमंत्रक ), देवकीनंदन सारस्वत, लीला गोविलकर, मंदाकिनी खांडेकर, प्रभाकर अत्रे, वसंत सावंत, द. ता. भोसले.



अनुक्रमणिका